डॉ. स्मिता दामले

# कलाटणी



कलाटणी (kalatani)

(इतिहास)

डॉ. स्मिता दामले

smitasuhas67@rediffmail.com

suhasdamle341@hotmail.com

Mobile: 9867364634



ई प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

esahity@gmail.com

9869674820

प्रकाशन : ५ जुलै २०१५

भारतातील प्राचीन आणि अर्वाचीन सर्व सत्ताधाऱ्यांना

सादर अर्पण.

# प्रस्तावना

या पृथ्वीतलावरच्या पंचमहासागरात जशी अनेकानेक लहानमोठी बेटं आहेत तशीच थोर पुरुषांची अनेक बेटं विविध देशांच्या सत्तासागरात निर्माण झाली. आपल्या अचाट, अलौकिक अद्भूत पराक्रमाने आणि राजकारणाने या नरोत्तमांनी इतिहासात आपलं नाव कोरलं. अलेक्झांडर, ते नेपोलियन, जॉर्ज वॉशिंग्टन, हिटलर, चर्चिल अशा अनेकांनी इतिहास घडवला. आपल्या देशात चोला-चालुक्यांपासून मौर्य, अशोक, ते शिवाजी, औरंगजेबापर्यंत साऱ्यांनी राजप्रवाहाला दिशा बदलायला लावली. यांच्यासारखेच अनेकानेक सेनापती लहान लहान बेटांसारखे होऊन गेले. बाजीराव ते आर्थर वेलस्ली, असे अनेक सेनापती पुरुषार्थाचा उत्कट आविष्कार दाखवून गेले. या आविष्कारांमुळे आणि अनुषंगिक प्रसंगांमुळे भारताच्या इतिहासाला कलाटणी मिळत गेली.

भारतासारख्या खंडप्राय देशात परकीय आक्रमणांमुळे इथलं सामान्य, शांत जीवन विस्कटलं जायला लागलं. भारतीय आचारविचार, संस्कृती, साहित्य, ज्ञानविज्ञान, धर्म - भाषा – रुढी, यांची मोडतोड झाली.  या आक्रमकांनी इथलं धन, दौलत, कला, शोध लुटून नेऊन आपले देश समृध्द केले. स्वतःचेही संस्कार-विचार भारतीयांवर लादले.

भारतात होऊन गेलेल्या आजवरच्या अनेक महत्वाच्या राजवंशांचा हा धावता आलेख आहे. सत्ता गाजवून गेलेल्या वंशांच्या विलयानंतर नवीन आलेल्या घराण्याला कलाटणी कशामुळे मिळाली, का मिळाली, याचा मागोवा आहे. ही कलाटणी जेव्हा जेव्हा मिळाली तेव्हा तेव्हा चटका लावून गेलेल्या काही नरोत्तमांच्या मृत्यूचा आलेख आहे. इ. स. पू. कालातल्या चोला-चालुक्यांपासून इ. स. १९४७ पर्यंत अखंड भारत स्वतंत्र झाला तोपर्यंतचा त्याचा इतिहास आहे.

वाचकांना हे लेखन आवडेल अशी आशा आहे.

डॉ. स्मिता दामले.

२१ एप्रिल २०१५

अक्षयतृतीया .

# कलाटणी.

विविधतेने नटलेल्या, नैसर्गिक संपदेने ओसंडून वाहणाऱ्या या भरत भूखंडाचा इतिहासही फार फार प्राचीन आहे. या देशातच संत निपजले, शूर जन्मले, वैज्ञानिकांनी शोध लावले, गणितज्ञांनी बुध्दीला चेतना दिली आणि साऱ्या जगात अनेक सिध्दांत सर्वांना वाटले. सोन्याचा धूर निधणाऱ्या या उपखंडामधे आणि सागराने वेढलेल्या या जमिनीवर वेळोवेळी साहसी लोकांनी कुतूहलाने, वा लोभाने वा प्रवासाच्या निमित्ताने, आपले पाय ठेवले, इथली साधन संपत्ती पाहून ती लुटून घरी नेली. शतकानुशतके स्वातंत्र्याचा उपभोग घेत राहणाऱ्या या भरत देशामधे आजूबाजूच्या सत्ताधीशांची नजर पडायला लागली आणि स्वाऱ्या-मोहिमांची वर्दळ सुरू झाली. शक, हूण, कुषाण, अफगाण, पठाण, तुर्की कितीएक आले, सैनिकांच्या खड्गांनी कुरुक्षेत्रापासून, पानिपतापासून बंगालपर्यंचा इतिहास अनेकवेळा नव्याने लिहिला गेला, आणि पुसलाही गेला. पानिपतापासून दिल्लीपर्यंतच्या भूमीत अनेक परकीय आले, आणि गेले. काही इथेच स्थिरावले. तरीसुध्दा कित्येक शतकांपर्यंत भरतभूमी हिंदू नरेशांच्या अधिपत्याखाली स्वातंत्र्याचा मुक्त उपभोग घेत होती.

या भरतभूच्या कुशीत धान्यांची सोन्याची कणसंच पिकली नाहीत, तर या मातीतून कोहिनूरसारखे हिरे-सोनं-जडजवाहिरही पिकलं, आणि याच मातीतून धर्मप्रवर्तक असे संतही जन्मले. याच मातीत गौतम बुध्द, महावीर, नानक यांनी बौध्द, जैन आणि शीख धर्माची स्थापना केली आणि शंकराचार्यांनी धर्मसंस्थापनाचं, रक्षणाचं आणि प्रसारणाचं महत् कार्य केलं. या भरतभूमीचं भाग्य मोठं की देवता आणि संत यांनी याच मातीत जन्म घेतला. ही माती धन्य झाली.गौतमाचा जन्म नेपाळमधे लुम्बिनिला झाला आणि त्यांचं बालपण कपिलवास्तुत गेलं. आई महामाया, आणि वडील शुध्दोदनाच्या पोटी त्यांचा ख्रि.पू. ५६३ मधे जन्म झाला.जगाला प्रकाशमान करून त्यांनी बौध्द धर्माची स्थापना केली आणि शांतीचा संदेश जगभर पोचवला. वयाच्या ८०व्या वर्षी हा शांतिदूत अस्ताला गेला. महावीरांचा जन्मकाल ख्रि.पू. ५९९ चा . जन्म बिहारमधला. चैत्री पौर्णिमेचा. क्षत्रिय घराण्यातला. आईचं नाव त्रिशला आणि वडिलांचं नाव सिध्दार्थ. महावीर जरी चोविसावे तीर्थंकर असले तरी जैन धर्माला त्यांनी नवीन परिमाण दिलं. जगाच्या पटलावरून ते निघून गेले ५२७ ख्रि.पू या वर्षी. बौध्द धर्माच्या पडत्या काळात हिंदू धर्माचं पुनरुत्थान केलं ते आदि शंकराचार्यांनी. केरळात जन्मलेल्या या तेजस्वी पुत्राने वयाच्या आठव्या वर्षी संन्यस्त होऊन गुरूच्या शोधात घर सोडलं. उत्तरेकडे ते निघाले. नर्मदेकाठी ओंकारेश्वरावर त्यांना त्यांच्या गुरूची, गोविंद भगवत् पद यांची प्राप्ती झाली. गुरूने विचारलं, ' तू कोण आहेस ? ' त्यावेळी त्यांनी दिलेलं ' शिवोऽहं शिवोऽहं ' हे प्रासादिक उत्तर अमर झालं. गुरु नानक यांनी शीख धर्माची स्थापना केली. लाहोरजवळच्या राय भोईकी तलवंडी या गावात त्यांचा १५ एप्रिल १४६९ मधे जन्म झाला. वडील कल्याणचंददास बेदी आणि आई तृप्तादेवी. अंतकाळी ते सध्याच्या पाकिस्तानातल्या कर्तारपूरला होते. २२ सप्टेंबर १५३९ हा त्यांचा निर्वाणदिन होता. भारतातून सुवर्णाच्या राशी जशा बाहेरच्या जगात गेल्या तशाच या धर्मवैचारिक प्रभावांच्या, अध्यात्माच्याही राशी जगभर पसरल्या.

सागरी भरती – ओहोटी हा निसर्गाचा नियमच आहे. लहान मोठ्या लाटा उचंबळणं हे तर नित्याचंच. तोच न्याय जसा माणसाच्या छोट्या आयुष्यातील घडामोडींना आहे तसाच राजकीय सत्तांतरालाही आहे. या भूमीच्या या मातीत कालौघात, सत्तांतराच्या अनेक लाटा उसळल्या आणि ११ व्या शतकापासून आत शिरलेले अफगाणी-तुराणी-दुराणी, पठाण, पाय रोवून पुढच्या सहाशे वर्षांमधे या मातीतलेच सत्ताधीश झाले. हिंदू समाज ओहोटीला लागला. या परकीयांशी हिंदू सत्ताधीश सतत संघर्ष करत राहिले. अनेक लढाया, जय –पराजय या भूमीने पाहले. स्वभावाने उद्योगी, विचारांनी आक्रमक आणि मनाने महत्वाकांक्षी, अशा पुरुषांनी संपत्ती –सत्ता – संघर्ष - लढाया, परत सत्ताविस्तार या मार्गाने हुकुमत गाजवली.

हा देश कृषीवलांचा. त्यातही तो बळीराजा पराक्रमी असेल तर त्याने मोठा जमीनदार व्हायचं. त्या घराण्यातल्या एका पराक्रमी पुरुषाने राज्य स्थापन करायचं, ते विस्तारायचं, वाढवायचं, त्याच्या पंखाखाली छोट्या छोट्या सुभेदारांनी आपापल्या भूमीच्या सीमा रक्षायच्या, आणि मग प्रमुख गादीचा वंशज कमजोर झाला की सुभेदाराने प्रबळ होऊन नवीन राजवंश निर्माण करायचा, या व्यवस्थेत भारतात अनेक राजघराणी निर्माण झाली. खंडप्राय असलेल्या हिंदुस्थानातील या सर्व राजघराण्यांच्या सत्तेला कशी कलाटणी मिळाली, कशामुळे कलाटणी मिळाली, प्रत्येकाची वंशपरंपरा कधी खंडीत झाली आणि या सगळ्यामागे जो मृत्यू नावाचा कठपुतळीचा जो दोर होता, त्याने हे दिग्गज, अलौकिक पुरुष नियतीने कसे नाचवले त्याने एक मोठा इतिहास निर्माण झाला. या सत्तांतरात अद्भूत, अलौकिक पराक्रम करणारे राजे आणि राण्याही होत्या.

आश्चर्य म्हणजे, आयुष्यभर सतत रणांगणावर असणारे रणधुरंधर असे सम्राट चंद्रगुप्त, अशोक, शहाजहाँ, औरंगजेब, शहाजी, शिवाजीमहाराज असे अनेक बहुतेक राजे आजारपणामुळे, वृध्दापकाळाने, वा खून झाल्यामुळे वा सिंहासनावरून खेचले गेल्यामुळे महालातच मृत्यू पावले आणि ज्या काही हातावर मोजण्याएवढ्या सेनानी राण्या झाल्या त्या रणांगणावर लढतांना वीरगतीला गेल्या. त्यात रझिया सुलतान होती, चांदबिबी होती, झांशीची राणी होती, कित्तूरची चिनम्मा होती. स्वराज्यातल्या शिवरायाच्या सुनेने, ताराणींनीही राज्याची सूत्रं सांभाळली. पण लढाईत त्या निधन पावल्या नाहीत एवढंच.

**या साऱ्या सत्तांतरांच्या कलाटणीचा हा इतिहास.**

या भूमीपटलावर अनेक तेजस्वी वीरपुरुषांची ब्रह्मदेवाने रचना केली. म्हणूनच, राधामाधव विलासचंपूच्या महाकाव्यात जयदेव पंडित म्हणतो,

‘‘ जगदीश विरंचिकू पुछत हैं,कहो सृष्टी रचि रख्के कौन कहाँ ।

शशि वो रवि पूरब पश्चिम लो, तुम सोये रहो सिरसिंधु महाँ।

अरू उत्तर दच्छिन रच्छनको , इत साहजी हैं उत साहजहाँ ।

जयदेव म्हणतो की या भरतभूमीवर ब्रह्मानेच पूर्व-पश्चिमेच्या रवी-शशी प्रमाणे भरतखंडाच्याही उत्तरदक्षिणेला शहाजहान आणि शहाजी यांची रचना केली होती. शहाजहाँचा जन्म १५९२ मधे आणि शहाजी जन्मला १५९५ मधे, तर शहाजहाँ निधन पावला १६६६ मधे आणि शहाजीराजे वारले १६६४ मधे. यांच्यानंतर त्यांचे पुत्र औरंगजेब आणि शिवाजी यांनी आयुष्यभर एकमेकांशी टक्कर दिली. नियती ही राष्ट्रपुरुषांना जन्माला घालते म्हणतात. आणि त्या अलौकिक पुरुषांचा कार्यभाग संपला की घेऊनही जात असावी. पण कधी कधी हेही दिसून येतं की राष्ट्रपुरुषांना लागणारी सामान्य माणसं जन्माला घालणं हेही नियतीच ठरवते. नाहीतर जिवा महाला, मदारी मेहेतर, हे इतिहासप्रसिध्द झालेच नसते. एखाद्या सिनेमाच्या एकट्या नायकावर तीन तास चित्रपट चालत नाही. त्याच्यासाठी एक ड्रायव्हर, एक गडी, अशी त्या पात्राच्या आजूबाजूला वेगवेगळी माणसं सिनेमाचा पटकथा लेखक उभी करतच असतो. तसंच आहे हे !

शतकानुशतकं, उत्तर-दक्षिण भारतात रुजलेल्या चोला-चालुक्य-मौर्य-गुप्त-राष्ट्रकूट यांच्या समाप्तीनंतर रजपूत, मराठी, वोडियार, कानडी, मोंगल, वगैरे सर्व लहान मोठ्या आणि देशी परदेशी सत्तांना पुढे पहिला शह मिळाला तो इ. स. १६०० साली इंग्लंडमधे स्थापन झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या इंग्रजांकडून. व्यापाराच्या निमित्ताने भारतात आलेल्या या

इंग्लंडमधल्या दर्यावर्दी लोकांनी भारतात व्यापाराच्या निमित्तानं प्रवेश केला. मग भारतातल्या राजांच्या भांडणांचा फायदा करुन घेत भारतात जम बसवला. आणि मग व्यापार करता करता, भेदनीतीने त्यांनी भारतभर आपलं साम्राज्य पसरवलं. फ्रेंच, डच, पोर्तुगीज हेही दर्यावर्दी भारतात येऊन थोडासा इतिहास रचून गेले.

इंग्रजांनी, सर्पाने आपल्या मोठ्या जबड्यात भक्ष्य हळूहळू गिळून संपवावं, तसं महाराष्ट्रातले सातारचे भोसले, पेशवे-शिंदे-होळकर-पवार-नागपूरचे भोसले, उत्तरेत अवध, दिल्लीतले मोगल, यांची रियासत संपवली. खाली दक्षिणेत टिपू मारला गेला. बंगालही इंग्रजांच्या घशात गेला आणि एकेकाला जिंकत इंग्रजांची सत्ता सार्वभौम झाली.

भारतीय युध्दांमधे तांत्रिक आणि वैज्ञानिक शस्त्रांचा अभाव आणि गृहकलह यामुळेच अनेक युध्दं पराभवात रूपांतरित झाली. त्याची सुरूवात रामायणापासूनच होते. गृहकलहामळे राम वनवासी झाला. जेव्हा राम दगड समुद्रात भरून सेतू बांधत होता तेव्हा लंकेतला राजा नलकुबेर पुष्पक विमान उडवत होता. ते सेतू बांधायचं तंत्र ब्रिटीशांनी पूल बांधेपर्यंत आपल्या लोकांनी विकसित केलं नाही. पिढ्यान् पिढ्या, दक्षिणेतलं लष्कर बऱ्हाणपूरमार्गेच, नदीला तिथे उतार असल्यामुळे, उत्तरेत प्रवेश करत असे. प्रगती एवढीच की होड्यांचा पूल सुरू झाला. ब्रिटीशांनी ही पध्दत, पूल बांधून बंद केली. युध्दतंत्रात भारताची कधीही प्रगती झाली नाही.

पूल बांधण्याच्या क्षेत्रात आपण किती मागे होतो, त्याची एक घटना इथे नमूद करण्यासारखी आहे. नाना फडणीस, त्यांच्या आयुष्यात काशीला जाऊन विश्वेश्वराचं दर्शन घेऊ शकले नाहीत. म्हणून तिथे काही पुण्यकर्म करावं या भावनेने त्यांनी तिथल्या कर्मनाशी नदीवर पूल बांधायचं ठरवलं. हे काम चालू झाल्यावर वाळू आणि पाणी यामुळे पायाच टिकेना. तेव्हा तेथील लोकांनी ६ सप्टेंबर १७९५ रोजी तिथल्या ब्राह्मणांकडून अनुष्ठानास प्रारंभ केला. ही गोष्ट नाना फडणीसांना पुण्यात कळताच त्यांनी अनुष्ठान, पूजा वगैरे प्रकार पत्र लिहून बंद करवले आणि बेकर नावाच्या इंग्रज इंजिनियरला बोलावून, त्याच्याकडून कलकत्ता येथून (चुन)'कळीचे बंब ' ( टँकर्स ) मागवले आणि पूल पूर्ण करवला.

युध्दशास्त्रातले हे शोध लागले मध्य आशियात, ग्रीस वगैरे देशांमधे. मध्य आशियातील फिरत्या टोळ्यांनी रिकीबीचा शोध लावला आणि युध्दशास्त्रात प्रचंड क्रांती झाली. सैनिकाला घोड्यावर स्वार होऊन धावतांनाही धनुष्यबाणाचा वापर करता यायला लागला. भारतातील घोड्यांपेक्षा भारतात येऊन गेलेल्या सर्व परकीयांचे घोडे हे जास्त उंच, ताकदवान असत. युध्दतंत्रात त्यांची शस्त्रास्त्रं जास्त आधुनिक होती. मध्य आशियातून येणाऱ्या या इराणी-दुराणी-तुराणी सेनानायकांकडे युध्दतंत्रातील विकसित शस्त्रं असत. त्यामुळे त्यांचा विजय निश्चित असे.

या अनेक आक्रमणांमधे भारताच्या सौभाग्याला कलाटणी देणारे, रसातळाला नेणारे तीन पुरुष आपल्या तीन पावलांमधे भारताची धूळधाण करून गेले. हे तीन जबरदस्त शत्रू म्हणजे :-

१. **पहिला अल्लाउद्दीन खिलजी**. ह्याने भारतात येणाऱ्या परकीयांची परंपरा मोडली. इराणी- दुराणी- तुराणी आले पण उत्तरेतच थांबले. खिलजी मात्र स्वतः विंध्य ओलांडून देवगिरीवर आला आणि रामदेवरायाला पराभूत करून त्याने अमाप लूट नेली.

२. **दुसरा बाबर**, ज्याने दिल्ली काबीज केल्यावर त्याच्या जबरदस्त वंशजांनी पुढच्या ३५० वर्षांमधे कालौघात भारताच्या धर्मिक स्थैर्याची वाताहत केली. आक्रमण, धर्मांतर, लूट, आणि मूर्तीभंजन, यांनी भारत विस्कटून टाकला. यांच्या काळात अनेक ठिकाणी जोहार झाले आणि भ्रष्ट होण्याच्या भीतीने अनेक नारी देह त्यागून गेल्या. याच काळात समाजाच्या

दु:खी मनावर अध्यात्माची फुंकर घालणारे कबीर-नानक-तुकोबा-समर्थ रामदास असे अनेक संत त्या योगेश्वराने या धरतीवर पाठवले. मनाने पिचलेल्या आणि खचलेल्या सामान्यांसाठी त्या काळाचीच ती गरज होती.

३. **तिसरा शत्रू म्हणजे इंग्रज** ज्यांनी सबंध भारतावरच धार्मिक-सांस्कृतिक–आर्थिक–वैचारिक– शैक्षणिक– वैदिक औद्योगिक–आयुर्वेदिक सर्वच क्षेत्रांची धूळधाण केली. भारतीय राहणीमानाला, परंपरांनाही मोडीत काढलं. जागतिकीकरणाची सुरुवात या लोकांनी केली असं म्हणायला हरकत नाही. कारण पृथ्वीच्या प्रत्येक रेखांशावर यांचं राज्य असलेले देश होते, आणि त्याचवेळी युरोपात वैज्ञानिक क्रांतीला पायघड्या घातल्या जात होत्या. त्याचा प्रसार सर्व जगभर होत होता. पृथ्वी पादाक्रांत करणंच होतं ते !

भारतासारख्या खंडप्राय देशात हिंदू राजवंशांच्या अनेक लाटा उसळल्या आणि विरल्या. उत्तरेत गुप्त, मौर्य, हर्षवर्धन, अशी मोठमोठी शूरांची घराणी राज्य करून गेली. आपली सत्ता विस्तारत गेली. तर दक्षिणेकडे राष्ट्रकूट, वाकाटक, होयसाळ, चालुक्य, सातवाहन, चोला, पंडियन, विजयनगरचे सम्राट, ओडियार असे अनेक सत्ताधीश सत्ता गाजवून गेले. ही अशी अनेक प्रसिध्द घराणी अनेक शतकापर्यंत राज्य करत होती. आपापल्या काळात हे राजे राज्य विस्तारत होते.

## प्राचीन भारतातील उत्तरेतील राजसत्ता :-

भारताचं मर्मस्थान म्हणजे काश्मीर. कश्मिरजः म्हणजे केशर. काश्मीर या शब्दाचा संस्कृत अर्थ केशरी. पुरातनकालापासूनच्या साहित्यात काश्मीरचा संदर्भ सापडतो. महाभारतात तर हिमालयाचा, कंबोज राजाचा उल्लेख माहीतच आहे. १२ व्या शतकात कल्हणाने काश्मीरचा इतिहास लिहिला. पुराणसाहित्यात काश्मीरची कथा सांगितली जाते. काश्मीरला प्रचंड मोठा तलाव होता. कश्यप ऋषींनी वराहमूल ( आताचं बारामुल्ला ) या गावाजवळची खिंड फोडून पाण्याला वाट करुन दिली. पाण्याचे लोटच्या लोट वाहून गेले आणि त्यानंतर कोरड्या झालेल्या जमिनीवर भारतीयांनी वस्ती केली. पुरातन काळात इथे हिंदू राजांची सत्ता होती. त्याकाळात काश्मीरच्या सत्तेखाली आताचे अफगाणिस्तान, पाकिस्तान, भारत, तिबेट, चीन, ताझिकिस्तानचा एवढ्या प्रदेशाचा समावेश होत होता.

**काश्मीरातल्या हिंदू राजवंशाला पहिली कलाटणी मिळाली ती इ. स. १३३९ साली मंगोलांनी काश्मीरवर स्वारी करून सत्ता काबीज केली तेव्हा**. शाह मीर हा पहिला मंगोल राजा. त्याने मुसलमान धर्माचा काश्मीरमधे पाया घातला. या मंगोली राजाकडून हुमायुँच्या सरदाराने काश्मीर जिंकून हुमायुँ राजवटीला प्रारंभ केला. त्यामुळे १५८६ ते १७५१ पर्यंत त्यांची हुकमत चालली. पुढे औरंगजेबाने आपली उन्हाळ्यातली राजधानी काश्मीरच केली. दरवर्षी तो सगळं मंत्रीमंडळ घेऊन काश्मीरला ६ महिने वास्तव्य करत असे.

त्यानंतर शेर-ए-पंजाब म्हणून ओळखला जाणारा पंजाबचा संस्थापक रणजितसिंग या शीख राजाने इ.स. १८१९ मधे अफगाणी लोकांकडून काश्मीर जिंकून घेतलं. रणजितसिंग १८०१ मधे सत्ताधीश झाला आणि त्याने लगेच राज्यविस्ताराला सुरुवात केली. आधी त्याने लाहोर जिंकलं. हळूहळू सर्व पंजाब त्याच्या हाताखाली आला. सतलज ते झेलम मधला सर्व प्रदेश त्याने जिंकला. रणजितसिंगचा १८३९ मधे मृत्यू झाल्यावर त्याच्या मुलाशी खरकसिंगशी इंग्रजांच्या लढाया झाल्या आणि १८४६ मधे दुसऱ्या अँग्लो- इंग्रज युध्दात इंग्रजांचा जय होऊन त्यावेळचा राजा दुलीपसिंग याला इंग्रजांनी इंग्लंडला नेऊन ठेवलं. त्यानंतर झालेल्या इंग्रज-शीख लढ्यात शीखांची सत्ता संपुष्टात आली आणि जम्मूचा राजा रणजितदेव

याचा मुलगा गुलाबसिंग हा ब्रिटीशांच्या मदतीने गादीवर आला. गुलाबसिंगनंतर रणबीरसिंग, हे राजे झाले. मग त्याचा नातू हरिसिंग स्वतंत्र भारताच्या वेळी राज्य चालवत होता. त्यानंतरचा इतिहास सर्वांनाच माहीत आहे.

उत्तरेतलं भारतीय इतिहासातलं पहिलं अविस्मरणीय युध्द म्हणजे हस्तिनापूरच्या कौरव-पांडवांचं युध्द. त्याला कारण ठरला तो आजच्या भाषेत सांगायचं झालं तर तेव्हाचा गांधार म्हणजे कंदाहार-अफगाणिस्तानचा युवराज शकुनिमामा. (तुर्कस्तान देश हा ययातीपुत्र तुर्वसुच्या वारसांचा समजला जातो. तुर्वसुवरुनच तुर्क हे नाव पडलं. अफगाणिस्तानचे दोन भाग होते. काबुलीस्थान आणि झाबुलीस्थान, म्हणजेच काबूल आणि झाबूल. काबूलमधे लालिया नावाच्या ब्राह्मण राजाची सत्ता होती. आणि झाबूलमधे रजपूताच्या हाती राज्याचे लगाम होते, पण १०व्या शतकात याकूब-इ-लाईस नावाच्या मुसलमानाने काबूल, झाबूल जिंकून मुसलमानी सत्तेचा प्रारंभ केला. )

कौरवांचा द्यूतामधे विजय होत होता तोही शकुनीच्या लबाडीच्या फाशांमुळे. अनैतिक आणि गैरमार्गाने मिळवलेला विजय. तेव्हापासून दिल्लीत अफगाणिस्तानचं युध्द सुरू झालं. परकीयांनी आपल्या देशात येऊन कौरव-पांडव या भावाभावांच्यात भांडणं लावून युध्दाचं, कुलनाशाचं महाभारत घडवण्याची ही पहिली घटना. तेव्हापासून इंग्रजांपर्यंत सर्व परकीयांनी भारतीयांच्या या स्वभावामुळे हेच केलं.

कुरुक्षेत्रावर झालेल्या युध्दात कौरव कुलाच्या दुर्योधन शाखेचा अंत होऊन पांडवांचा वंश राजा परिक्षित हस्तिनापुरात सिंहासनारूढ झाला. **ही भारतीय राजपटलाच्या इतिहासातली पहिली कलाटणी.** असं म्हणतात की ५०० वर्षांनंतर पांडव कुलाचा शेवटचा राजा क्षमक याच्या सेनापतीने क्षमकाला दूर करुन आपल्या हाती सत्ता घेतली. त्यानंतर गौतम वंशाचा अंमल हस्तिनापूरावर सुरू झाला आणि पुढे ३०० वर्षे तो चालला. त्यानंतर काय झालं त्याचा उल्लेख कुठे सापडत नाही.

आधी हस्तिनापूर, इंद्रप्रस्थ या नावांच्या नंतर ती नावं काळाच्या ओघात कधी लुप्त झाली ते कळत नाही. आणि मग दिल्ली या नावाने खूप मोठा इतिहास पहाणाऱ्या या नगराचा पहिला उल्लेख सापडतो तो अमिर खुस्त्रोच्या पंक्तींमधे. पश्चिमेकडून येणाऱ्या प्रवाशांना, व्यापाऱ्यांना यमुना ओलांडून पूर्वेला जायचं असेल तर ते तांडे दिल्लीच्या परिसरात मुक्काम करत असत असाही उल्लेख सापडतो. दिल्ली या नावाच्या जन्माचे अनेक प्रवाद आहेत. ढिल्लू, किंवा दिल्लू नावाच्या राजाने ही नगरी वसवली म्हणून दिल्ली. दुसरा प्रवाद म्हणजे भारताचा उबंरठा म्हणून ‘ देहली ‘ म्हणजे उंबरठा. या नगरीवर उत्तरेतून अनेक आक्रमणं झाली, ती प्रथम या उंबरठ्यावर थांबली. या नगरीने खूप राज्यकर्ते पाहिले. बाहेरून आलेल्या या बहुतेक सत्ताधाऱ्यांचा अंत खंजीरानेच झाला. काही फासावर लटकले, काही आजाराने कबरीत दफन केले गेले. यमुनेचं पाणी अनेक वेळा रक्ताने लाल झालं. क्रूर नरसंहारांचे प्रेतांचे ढीग या नगरीने प्रत्येक आक्रमणानंतर खूप वेळा पाहिले. दिल्ली कधी बहरली, सजली, तर कधी करपली. भकास झाली. उजाड झाली, पण यमुनेच्या तीराकाठी परत परत अंकुरत बहरत राहिली.

उत्तर भारतावर पहिली मोठी टोळधाड आली ती सिकंदर नावाच्या जग जिंकायला निघालेल्या राजपुत्राची. इ.स.पूर्व ३३६ मधे राजा फिलिपच्या मृत्यूनंतर गादीवर आलेल्या अलेक्झांडरचं वय अवघं २० वर्षाचं होतं. आपली सर्व मिळकत गहाण ठेवून त्याने प्रचंड सैन्य उभं केलं आणि तो शत्रूंच्या समाचाराला राज्याबाहेर पडला. दहा वर्षानंतर इ.स. पूर्व ३२६ मधे त्याने आशिया खंडात प्रवेश केला. त्याने तक्षशिला जिंकली आणि झेलमच्या किनाऱ्यावर इतिहासप्रसिध्द परकीयांबरोबरची पहिली लढाई झाली ती पोरस आणि अलेक्झांडरमधे. अलेक्झांडरकडे नवीन तंत्रज्ञानानी परिपूर्ण असं सैन्य होतं. त्यांच्या घोड्यांना चिलखत होतं, सैनिकालाही शिरस्त्राण, हलक्या वजनाचे भाले, लांब तलवारी अशी सुसज्ज हत्यारे, तगडे, उंच, चपळ आणि पटकन न थकणारे घोडे, ही सिकंदरची शक्तीस्थळं होती. नदी ओलांडण्यासाठी त्याच्याकडे होड्या होत्या, त्याचे सुटे भाग

करता येत होते आणि ते भाग बैलगाडीवर घालून त्याने आणले होते. अशा सुसज्ज सैन्यासह तो तक्षशीलावर उतरला. हिंदू राजा अंभी त्याला जाऊन मिळाला. आणि पोरसबरोबर अलेक्झांडर लढाईत भिडला कारण बाकी सर्व राजे सिकंदरला शरण आले पण पोरसने त्याला आव्हान दिलं. चिनाब आणि झेलमच्या चिमटीतला भूभाग पोरसच्या मालकीचा होता. तोही महत्वाकांक्षी आणि पराक्रमी राजा होता. रथ, चपळ हालचाली न करणारे हत्ती आणि जुनं युध्दतंत्र यामुळे पोरस लढाई हरला. पोरसच्या खांद्यावर जखम झाली, त्याची शुध्द जाऊ लागली तेव्हा अलेक्झांडरच्या सांगण्यावरून पोरसने शस्त्र खाली ठेवलं आणि लढाई थांबली. इतिहासात अमर झालेलं पोरसचं, तुला कसं वागवू असं अलेक्झांडरने विचारल्यावर, ‘एका राजासारखं ‘ हे वाक्य ऐकून अलेक्झांडरने त्याच्याशी मैत्री करून त्याचं राज्य त्याला परत केलं आणि तो पुढच्या मोहिमेवर निघून गेला. सिकंदर निघून गेल्यावर त्याचे काही सैनिक या मातीत सेनापतीच्या हाताखाली स्थिरावले. त्या सैनिकांकडूनच शिक्षण घेऊन भरतभूमीवरचा कुटील राजकारणी चाणक्याने धनानंदाचा पराभव केला. तात्पर्य , अलेक्झांडरमुळे राजसत्तेला कलाटणी मात्र मिळाली नाही.

उत्तरेतल्या गंगा-यमुना आणि इतर अनेक नद्यांच्या सुपीक,सुजलाम् सुफलाम् खोऱ्यांमधे अनेक राजघराणी उदयाला आली आणि विराम पावली. त्यातील महत्वाची घराणी होती-

१. मौर्य- इ.स.पू. ३२० ते इ.स.पू.१८४.

२. पुष्यमित्र सुंग :- मौर्य घराण्याचा शेवट करुन त्यांचा सेनापती पुष्यमित्राने सत्ता काबीज केली. ही राजसत्ता इ. स. पू. ७५ पर्यंत चालली.

३. गुप्त- इ.स. ३२० ते इ. स. ५५० . या घराण्यातही चंद्र गुप्त नावाचा पराक्रमी राजा झाला. पाल घराण्याने यांचा अंत केला.

४. हर्षवर्धन – इ. स. ५४०ते ६४७. हर्षवर्धनानंतर झपाट्याने या राजवंशाचा शेवट झाला. त्या राज्याचे लहान लहान तुकडे होऊन राज्य संपलं.

शिवाय शक – हूण – युची वगैरे परकीयांची आक्रमणं होतंच राहिली. या युची घराण्यातलाच कनिष्क हा राजा प्रसिध्दीला आला.

**मौर्य :-**

धनानंदाला हरवून चंद्रगुप्त मौर्य याची चाणक्याने गादीवर स्थापना केल्यावर मौर्य घराण्याला सुरुवात झाली.

इ.स. पू. ५००च्या सुमारास बिंबिसार नावाचा राजा होऊन गेला. त्याच्या वंशात जन्मला उदय नावाचा राजा, ज्याने गंगेच्या काठी नवीन शहर वसवलं आणि नाव दिलं पुष्पपूर. हीच नगरी पुढे पाटलीपुत्र या नावाने ओळखली जाऊ लागली. या उदयराजाच्या घराण्यातल्या महानंदिनाला शूद्र स्त्रीपासून महापद्मानंद नावाचा मुलगा झाला. तेच नंद नावाने सुरु झालेलं घराणं. बापाकडून त्याने राज्य हिसकावून घेतलं. याचाच मुलगा धनानंद. यानेही आपल्या क्रूर, जुलमी कारभारामुळे प्रजेला छळलं.

या नंद घराण्यातल्या दुसऱ्या एका पुरुषाला मुरा नावाच्या शूद्र स्त्रीपासून मुलगा झाला. त्याचं नाव चंद्रगुप्त. या मायलेकरांना दोघांना धनानंदाने हाकलून लावल्यामुळे तो आईबरोबर रानावनात भटकत दिवस घालवत असतांनाच, याच

धनानंदाच्या दरबारात झालेल्या अपमानामुळे सूडाने पेटलेला चाणक्य, योगायोगाने चंद्रगुप्ताला भेटला. **आणि त्यादिवशी भारतीय इतिहासात अमर झालेला आणि कलाटणी देणारा भारताचा इतिहास चाणक्य आणि चंद्रगुप्त मौर्य या दोन पुरुषांनी, घडवला. धनानंदाला ठार करून त्यांनी मौर्य साम्राज्याचा पाया घातला.** चणक गावचा चाणक्य, कुटील राजकारण करणारा कौटिल्य आणि मूळ विष्णुगुप्त नावाने ज्ञात असलेला चाणक्य.

चंद्रगुप्ताचा राज्यविस्तार सुरू झाला. सर्वात मोठ्या साम्राज्याचे सम्राट म्हणून या राजघराण्याचा लौकिक झाला. उत्तरेला हिमालय, पूर्वेला आसाम, पश्चिमेला बलुचिस्तान, हिंदुकुशाच्या पर्वतरांगा म्हणजे अफगाणिस्तान आणि दक्षिणेला गोदावरीपर्यंत एवढा यांचा राज्यविस्तार होता. चंद्रगुप्त ख्रि.पू. ३२० ते २९८, त्याचा पुत्र बिंदुसार ख्रि.पू. २९८ ते २७२, नंतर सम्राट अशोक इ. स. पू. २६८ ते २३२ असे पराक्रमी राज्यकर्ते या घराण्यात झाले.

चंद्रगुप्तानंतर त्याचा पुत्र बिंदुसार गादीवर आला. बिंदुसाराच्या जन्माची एक मनोरंजक कथा प्रचलित आहे. आर्य चाणक्यांनी चंद्रगुप्ताला घडवलं आणि धनानंदाचा पराभव करून गादीवर बसवलं. पण त्याला कुणी विषप्रयोगाने ठार मारेल या भीतीने चाणक्याने रोज त्याच्या जेवणात थोडा अंश विषाचा घालून त्याच्या शरीराला विषाची ओळख करून ठेवली होती. त्यामुळे चंद्रगुप्ताला विषाचा त्रास होत नसे. प्रत्यक्षात चंद्रगुप्त मौर्याला हे माहीतही नव्हतं.

एकदा चंद्रगुप्ताची राणी त्याच्याबरोबर भोजनाला बसली. तेव्हा चंद्रगुप्ताने मोठ्या प्रेमाने तिला आपल्या ताटातला पदार्थ खायला दिला. त्यावेळी राणीचा प्रसवकाल अगदी जवळ म्हणजे ८ – १५ दिवसांवर आालेला होता. राणीने तो पदार्थ खाल्ल्याबरोबर विषप्रयोगामुळे ती लगेच गतप्राण झाली. चंद्रगुप्त भांबावला, पण त्याचवेळी चाणक्य योगायोगाने त्या महालात आला होता. चाणक्याने प्रसंग पाहून लगेच वैद्यांना बोलावलं आणि राणीच्या पोटातलं बाळ सुखरूप बाहेर काढलं. पण बाळावर थोडासा विषाचा अंमल झालेला होता. त्याच्या कपाळावर एक छोटा नीळा बिंदू उमटला होता. म्हणून त्या नवजात बाळाचं नाव बिंदुसार पडलं. हाही महापराक्रमी होता.

त्यानंतर आला त्याचा पुत्र सम्राट अशोक. सम्राट अशोकापर्यंत जवळ जवळ सारा भारत त्याच्या हाताखाली आलेला होता, एवढं प्रचंड राज्य त्याच्या अंकुशाखाली होतं. बिंदुसाराने मागे ठेवलेलं, कलिंग देश आपल्या साम्राज्याला जोडायचं मोठं काम अशोकाने हाती घेतलं. या लढाईमधे नागरिक आणि सैनिक मिळून एक लाख लोक गतप्राण झाले. राज्यविस्तारासाठी त्याने केलेल्या या कलिंग युध्दात जो मानवी संहार झाला त्याच्या पश्चात्तापाने अशोकाने बौध्द धर्म स्वीकारला आणि त्याचा जगभर प्रसार केला. ( आयुष्यभर लढाया करणाऱ्या सम्राटाला कलिंग हा शेवटचा प्रदेश आपल्या साम्राज्याला जोडल्यावरच युध्द, नरसंहार याची घृणा आली. हीसुध्दा नोंद घेण्यासारखीच वास्तवता. )

**मात्र अशोकानंतर या घराण्याला झपाट्याने उतरती कळा लागली आणि बृहद्रथ मौर्य या मौर्य घराण्याच्या शेवटच्या वंशजानंतर, त्याचाच सेनापती पुष्यमित्र सुंगाने, उठाव करून हे घराणं उलथून आपल्या हातात सत्ता घेतली**. बृहद्रथ मौर्यानंतर, इ. स. पू. १८७ ते १८०पर्यंत हे घराणं लयाला जाऊन इ. स. पू. १८० मधे सुंग घराणं सत्तेत आलं. पण ते घराणं थोडाच काळ टिकलं. साधारण ४-५ पिढ्यांनीच या घराण्यात राज्य केलं. इ. स. पू. ७५ मधे सुंग घराणं विलयाला गेलं.

यानंतर शक, युची, अशा टोळ्यांनी भारतावर हल्ले करून लहानमोठी राज्यं स्थापन केली. या कुषाणांच्या वंशात प्रसिध्द राजा म्हणजे कनिष्क होऊन गेला. याने बौध्द धर्माचा खूप प्रसार केला.

## गुप्त राजवंश :-

श्रीगुप्त हा या राजवंशाचा संस्थापक. इ.स. २४० जवळपास याने राज्य करायला सुरुवात केला. याचा नातू पराक्रमाने गाजलेला आणखी एक चंद्र गुप्त, गुप्त राजवंशाचा सम्राट म्हणजे मगधाचा राजा चंद्रगुप्त, जो इ.स. ३२२ मधे गादीवर आला. चंद्रगुप्तानंतर त्याचा पुत्र समुद्रगुप्त गादीवर आला. या समुद्रगुप्ताला परकीयांनी इंडियन नेपोलियन म्हणून गौरवलं आहे. गुप्त साम्राज्याचा काळ हा सुवर्णयुगाचा काळ मानला जातो. यांच्याच काळात हूणांच्या भारतावर स्वाऱ्या झाल्या. चंद्रगुप्त दुसरा, म्हणजेच सम्राट विक्रमादित्याच्या काळात यांच्या साम्राज्याची चहूअंगाने भरभराट झाली. कालिदास, आर्यभट्ट, वराहमिहिर, वात्सायन, अशा अनेक पंडितांनी यांच्या दरबारात मानाचं स्थान मिळवलं. अजंठा, वेरूळ. घारापुरी ही सर्व शिल्पकलेच्या सुंदर गुंफांची देणगी यांच्याच काळात भारतात सजली.

## हर्षवर्धन :-

मौर्य घराण्याचा अंत झाल्यावर लहानमोठे जहागिरदार स्वायत्त झाले. त्यात प्रभाकरवर्धन याने आपलं एक छोटं राज्य निर्माण केलं. इ.स. ५४० ला यांची सत्ता सुरु झाली. प्रभाकरवर्धनाला दोन मुलगे राजवर्धन आणि हर्षवर्धन आणि एक मुलगी राजश्री. हर्षवर्धनाचा जन्म इ.स. ५९० मधे झाला. आपल्या पराक्रमाने याने पंजाब, राजस्थान, गुजरात, बंगाल, ओरिसा, पर्यंत आपल्या सीमा वाढवल्या. नर्मदेच्या उत्तर तीरापर्यंत याची सत्ता होती. राजवर्धन थानेसराचा म्हणजे कुरुक्षेत्राचा प्रदेश सांभाळत होता. तो लढाईत मारला गेल्यावर हर्षवर्धन संपूर्ण राज्याचा मालक झाला. तेव्हा तो १६ वर्षाचा होता. याला साहित्याचीही खूप आवड होती. याने संस्कृत मधे नागानंद, रत्नावली, आणि प्रियदर्शिका ही तीन नाटकं लिहिली होती. याच्याच कारकीर्दीत कुंभमेळ्याला सुरुवात झाली. चालुक्य राजा दुसरा पुलकेशीने हर्षवर्धनचा पराभव केला. इ. स. ६४७ मधे याचा मृत्यू झाला. त्यानंतर याचे दोन्ही मुलगे हर्षवर्धनाच्या दरबारातल्या प्रधानमंत्र्याकडून मारले गेले. हर्षाची पत्नी राणी दुर्गावती कैदेत पडली. **त्यानंतर राज्याचे लहान लहान तुकडे होऊन साम्राज्याचं विघटन झालं.**

## प्राचीन भारतातील दक्षिणेतील राजघराणी :-

चोला :- ख्रि.पू. ३०० ते इ. स. १२७९.

सातवाहन :- ख्रि.पू. २३० ते इ. स. ४५०

चालुक्य :- पहिला पुलकेशी हा या राजसत्तेचा संस्थापक. इ.स. ५४३ मधे याची सुरुवात झाली.

वाकाटक :- सातवाहनांचा विलय आणि तिसऱ्या शतकात यांचा उदय.

राष्ट्रकूट :- इ.स. ७५३ मधे दंतिदुर्ग या राजवटीचा संस्थापक. १०व्या शतकाच्या अखेरीस हे घराणं अस्तंगत झालं.

होयसाल :- १०व्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंत अंमल चालवला.

विजयनगर :- इ.स १३३६ मधे हरिहर - बुक्क या बंधूंनी राज्य स्थापन केलं.

बहामनीनंतरच्या पाच शाह्या. :- निजामशाही, आदिलशाही, कुतुबशाही, बरीदशाही, इमादशाही.

ओडियार :- १३९९ ते १९४७. वोडियार हा शब्द नसून त्यातला व शब्द उच्चारला जात नााही म्हणून याचा उच्चार ओडियार करावा लागतो.

**चोला :-**

दक्षिणेतील सर्वात जुनी राजसत्ता म्हणजे म्हणजे चोला सम्राट. ख्रि.पू. ३०० पासून इ.स. १२७९ पर्यंत हे घराणं सत्तेत राहिलं. चोला, पंडियान आणि चेराज अशा तीन घराण्याच्या पुरुषांपासून यांचा उदय झाला. तिघांनी मिळून राज्य विस्तार सुरू केला. आत्ताचा केरळ, कन्याकुमारी आणि चेन्नईचा भूप्रदेश म्हणजे चोला साम्राज्याच्या अधिकाराचा भाग होता. तामिळी सत्तेचा प्रवाह यांच्या काळात सुरू झाला. पुढे यांच्या वंशजांनी आताच्या पूर्व आशियातील मालदीव, श्रीलंका, मलेशिया, इंडोनेशिया, द. थायलंड, आणि आताचा बांगला देश इथपर्यंत आपल्या सीमा विस्तारल्या. यांच्या काळात दक्षिणेतली  आता आपण पाहातो ती सर्व सुंदर मंदिरं बांधली गेली. तामिळी भाषेला, साहित्याला, वास्तुकलेला यांच्या काळात मोठा राजाश्रय मिळाला. बृहाडेश्वराचं मंदिर आणि ऐरावतेश्वराचं कुंभकोणम् मधील मंदिर यांच्या शिल्पकलेला उत्तेजन देणाच्या राजाश्रयाची साक्ष देतात. णदुरेचं मीनाक्षी मंदिर याच पंडियन घराण्याने बांधलं.

**इ. स. १२१५ मधे पंडियन घराण्यातल्या सम्राटाने चोला राजाला लढाईत हरवून सत्ता आपल्या ताब्यात घेतली आणि चोला घराण्याचा अंत झाला**. या पंडियन राजाने होयसाळ घराण्याच्या सत्तेचाही पराभव केला चोला-होयसाळ ही दोन मोठी राजघराणी कालौघात विरून गेली. पंडियनांची मोठी लाट मोंगल आक्रमणात १३ व्या शतकात नामशेष झाली.

**सातवाहन :-**

सातवाहनांची सत्ता महाराष्ट्रात सुरु झाली. इ. स. पू. २३० मधे, मौर्य काळात सुभेदार असलेल्या सिमुख नावाच्या सातवाहनाने आपली सत्ता सुरु केली. आंध्रातील अमरावती, महाराष्ट्रातील जुन्नर आणि पैठण ही सातवाहनांची मूळपिठीका. ग्रीकचा प्रवासी मॅगेस्थेनियस याने सातवाहनांच्या प्रचंड ऐश्वर्याची नोंद केली आहे, त्यात म्हटलं आहे की सातवाहनांकडे एक लाख पायदळ, १ हजार हत्ती, आणि ३० अत्यंत सुंदर, सुरक्षित अशी शहरं आहेत. शालिवाहन शक ज्याने सुरु केलं त्या गौतमीपुत्राचं म्हणजेच शालीवाहनाचं, हे सुप्रसिध्द राजघराणं.  इ. स. ७८ मधे शकांचा पराभव करुन शालिवाहनाने संवत्सर सुरु केलं. महाराष्ट्र, गुजरात, कर्नाटक, तेलगु प्रदेशांमधे शालिवाहन शक वापरलं जाई. ख्रिस्तपूर्व २३० ते इ.स. ४५० सालापर्यंत यांची सत्ता चालली. सम्राट अशोकाच्या काळात सातवाहन हे अशोकाचे जागिरदार होते. अशोकानंतर मौर्य साम्राज्याला उतरती कळा लागली, आणि सातवाहन वंश उदयाला येऊ लागला. मौर्य घराण्याचा अंत झाल्यावर याच नरेशांनी भारतात शांतता नांदवली. शक, यवनांपासून देशाचं संरक्षण केलं. सुंग राजवटीचा पराभव केला. इ. स. २०० नंतर मात्र ह्यांचे वंशज कमजोर व्हायला लागले आणि जहागिरदार प्रबळ व्हायला लागले, तेव्हा ह्या राजवंशाचा अंत झाला. अमरावती ही त्यांची राजधानी होती. महाराष्ट्रात जुन्नर आणि पैठण आणि आंध्रात धरणीकोटा आणि आम्रपाली या ठिकाणी त्यांच्या शाखांनी राज्य केलं. सांचीचा स्तूप यांच्याच काळात घडवला गेला. दक्षिण आणि उत्तर भारताला जोडणारी अशी ही राजसंस्था होती.

यांच्या काळात देशात शांतता नांदली. नरसंहार कमी झाला.

या घराण्याचाही शेवट वारस कमजोर होत जाणं आणि जागिरदार प्रबळ होत जाणं याच मार्गाने झाला.

**वाकाटक :-**

सातवाहनांचेच पुढचे वंशज म्हणजे वाकाटक. इ.स. २५० मधे विंध्यशक्तीने या घराण्याला सुरुवात केली. २७० पर्यंत याने राज्य केलं. हरिशेन या राजाच्या काळात अजिंठ्याच्या लेण्यांना खूप प्रोत्साहन मिळालं. गुप्तांचे हे समकालीन. ह्यांचाही काळ हा भारतासाठी सुवर्णकाळच होता. गुप्त घराण्यात आणि ह्या घराण्यात विवाहही झाला होता. यांचा शेवट कसा झाला ते ज्ञात नाही. माळवा ते तुंगभद्रापर्यंत यांचं राज्य होतं.

**राष्ट्रकूट :-**

नंतर जुना उल्लेख सापडतो तो राष्ट्रकूट राजवटीचा. या घराण्याचा मूळ पुरुष महाभारताच्या अस्तानंतर कधीतरी पंजाबमधून दक्षिणेत आला आणि त्याच्या नंतरच्या वंशजांच्या कर्तृत्वाने त्याचा भाग्योदय झाला असा प्रवाद आहे. ताम्रपटांमधून, पाली साहित्यातून यांचा उल्लेख सापडत गेला. काही अरब लोकांच्या नोंदींवरूनही यांची माहिती मिळत गेली. इ.स. ७५३ मधे या घराण्याचा जमीनदार दंतिदुर्ग याने बदामीच्या चालुक्य घराण्याच्या कीर्तीवर्मन दुसरा, याचा पराभव करून त्याचं राज्य ताब्यात घेतलं आणि या घराण्याचा पाया घातला. सहाव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत या घराण्याने भारतात कनोजपासून कन्याकुमारीपर्यंत सत्ता गाजवली. कन्नड ही त्यांची बोलीभाषा होती. दहाव्या शतकाच्या अखेरीस या घराण्याचा विलय झाला. वेरुळची लेणी, घारापुरीची लेणी त्यांच्याच काळात आकारली.

इ.स. ९७२ मधे परमार राजा हर्ष याने राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेतावर स्वारी केली, तेव्हापासून या घराण्याच्या सत्तेला उतरती कळा लागली. **राष्ट्रकूटांचा जोर कमी झालेला पाहिल्याबरोबर त्याचा फायदा घेणारा त्यांचा अंमलदार म्हणजे विजापूरचा अधिकारी तैलप्पा. पाठोपाठ इतरही अधिकारी स्वतंत्र झाले आणि राष्ट्रकूटांच्या सत्तेचा अंत झाला.**

**होयसाल :-**

होयसाल राजसत्तेचा उदय विष्णूवर्धनापासून मानला जातो. त्याआधी त्याचे पूर्वज आपल्या वतनाचा विस्तार करतच होते. होयसाळ घराण्याची पहिली नोंद इ. स. ९५० सालची आहे. पण राजघराण्याचं रुप मात्र विष्णूवर्धनापासून म्हणजे इ.स. ११०८ पासून सुरु झालं. त्याने पराक्रम गाजवला आणि आपल्या राज्याचा विस्तार केला. दहाव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत यांनी सत्ता गाजवली. बेलूर ही त्यांची राजधानी होती.नंतर ती हळेबीडला हलवण्यात आली. यांच्या काळात शिल्प, वास्तू कलांना खूप प्रोत्साहन मिळालं. होयसाळ नाव कसं पडलं याची आख्यायिका सांगितली जाते. ती म्हणजे, साळ नावाच्या तरूणाने आपले गुरु सुदत्त यांचा जीव, त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या सिंहापासून वाचवला. सिंहाला ठार केलं. ही घटना कर्नाटकातल्या अंगडी गावात वसंतिका देवीच्या देवळाजवळ घडली. प्राचीन कानडी भाषेत होय म्हणजे मारणे त्यावरून त्याच्या वंशातल्या लोकांनी पुढे आपल्या घराण्याचं होयसाळ नाव धारण केलं. बंगळूरु याच सत्ताधीशांनी वसवलं. विष्णूवर्धनानंतर त्याच्या वंशजांनी इ.स. १३४३ पर्यंत राज्य केलं. उत्तरेतल्या खिलजीची धाड दक्षिणेत आल्यावर त्याने एकएक जुनी हिंदू राज्यं गिळायला सुरुवात केली. पण होयसाळ राजवंशांनी त्याचा प्रतिकार केला. पण शेवटी वीरबल्लाळ हा राजा लढाईत ठार झाला.

**त्यानंतर मात्र होयसाळ राज्य हरिहराने स्थापन केलेल्या विजयनगर साम्राज्याला जोडलं गेलं, आणि नंतर नामशेष झालं. ११०८ पासून १३४३ पर्यंत हे घराणं सत्तेत राहिलं.**

**चालुक्य :-**

चालुक्य घराण्यानेही असाच इतिहास दक्षिण भारतात निर्माण केला. दक्षिण भारतापासून, कावेरीचा उत्तर तीर ते नर्मदेचा द. तीर, यामधे-मध्य भारतापर्यंत या घराण्यातील पराक्रमी राजांनी आपल्या सीमा विस्तारल्या. कदंब राजसत्तेचा उतरणीचा काल हा चालुक्यांच्या उदयाचा आरंभ होता. बदामीला जिंकून पुलकेशी पहिला याने चालुक्य घराण्याची स्थापना केली. त्यामुळे बदामीचे चालुक्य अशीच यांची नोंद आहे. चालुक्य घराण्याच्या तीन शाखा होत्या. बदामीवर कांचीपुरमच्या पल्लवांनी सत्ता काबीज करून काही वर्ष चालुक्यांना सत्तेबाहेर ठेवलं. पण विक्रमादित्य या विजयादित्याच्या युवराजाने इ. स. ७३३ मधे गादीवर आल्यावर कांचीपुरम्वर हल्ला करून परत चालुक्यांच्या सत्तेला प्रारंभ केला. विक्रमादित्य दुसरा याच्या अधिकार काळात चालुक्य घराणं अत्युच्च शिखरावर होतं. कीर्तीवर्मन हा या धराण्याचा शेवटचा राजा. कल्याणी चालुक्य हे पश्चिमेकडचं घराणं, वेंगी चालुक्य हे पूर्वेकडचं घराणं.

वेंगीचे चालुक्य म्हणजे आताचा आंध्र प्रदेशाचा भाग. दुसरा पुलकेशी याने आंध्र भाग जिंकून तिथे आपला भाऊ कुब्ज विष्णूवर्धन याला सुभेदार म्हणून नेमलं. पुलकेशीच्या अंतानंतर विष्णूवर्धनाची शाखा स्वतंत्र झाली. आणि हे चालुक्य वेंगी चालुक्य म्हणून ओळखले जाऊ लागले. सातच्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत या घराण्याची सत्ता चालू राहिली. चोला राज्यात सामावून या घराण्याची सत्ता संपली. तेलगु भाषेची भरभराट यांच्या काळात झाली.

कल्याणी चालुक्य म्हणजे पश्चिमेकडील चालुक्य घराणं. राष्ट्रकूटांच्या राजवटीत हे चालुक्य त्यांचे जागिरदार म्हणून वावरत होते. आठव्या शतकात चालुक्यांच्या घराण्यातील तैलप्पा दुसरा याच्यापासून या घराण्याचा भाग्योदय झाला. त्याने राष्ट्रकूटांपासून स्वतंत्र होऊन चालुक्य घराण्याचा अंमल सुरु केला. या घराण्यातील विक्रमादित्याने विक्रम संवत्सर सुरु केलं. इ. स. १०१२ मधे सोमेश्वराने आपली राजधानी कल्याणी इथे नेली. **होयसाळांनी चालुक्यांना इ. स. १२०० मधे जिंकलं आणि या राजसत्तेचा शेवट झाला.**

अशा तीन शाखांमधे या घराण्याचा विस्तार झाला. यांचा राज्यकाळ हा दक्षिणभारताचा सुवर्णकाळ मानला जातो, कारण या काळात कानडी साहित्य, शिल्प, वास्तू अशा कलांना भरभरून उत्तेजन मिळालं. चीनी प्रवासी ह्युएन त्संग हा पुलकेशी दुसरा याच्या दरबारात भेट घ्यायला गेला होता. या पुलकेशीनेच आपल्या साम्राज्याची कर्नाटक, महाराष्ट्र, कोकण किनारपट्टी असा तीन भागात वाटणी केली आणि अंमल चालवला. प्रत्येक भागात ९९००० खेडी होती. **इ. स. ७५३ मधे राष्ट्रकूटांच्या दंतिदुर्गाने चालुक्यांना जिंकल्यावर बदामी चालुक्य ही राजसत्ता विलयाला गेली.**

चोला, चालुक्य राष्ट्रकूट घराण्यातील राजांचा सतत संघर्ष होत राहिला. एकमेकांचा प्रदेश मिळवण्यासाठी हे सतत लढत राहिले.

**पालव :-**

दक्षिणेतल्या पालव घराण्याने तेलगु राज्याचा पाया घातला. कांचीपुरम् ही आपली राजधानी केली. सातवाहनांच्या अस्तानंतर यांचा उदय झाला. इ. स. २७५ ते इ. स. ५६० पर्यंत ही राजसत्ता अधिकारात होती. त्यानंतर हे चोला साम्राज्यात विलीन झालं.

काळ पुढे पुढे सरकत होता. हिंदू राजांच्या सत्तांचा उदय आणि विलय निसर्गक्रमाने होतच होता. दहाव्या शतकापर्यंत भारत हिंदूचंच राष्ट्र होतं. परकीयांची आक्रमणं झाली तरी ते संपत्ती लुटायचे आणि निघून जायचे. गझनीचा महंमद वारंवार उत्तर भारतापर्यंतच येत राहिला. पण १२ व्या शतकात महंमद घोरीने पृथ्वीराज चौहानचा पराभव करून भारतात मुसलमान राजवटीचा पाया घातला. त्याचे पडसाद लगेच द. भारतात उमटले नाहीत. पण त्यानंतर आलेल्या अल्लाउद्दिन खिलजीमुळे उत्तर आणि द. भारत परकीयांच्या मुसलमान टाचेखाली आला. आणि उत्तरोत्तर मुसमान विरुध्द हिंदू हा संघर्ष शतकानुशतके भारतात घुमतच राहिला. दक्षिण भारतात मुसलमानी सत्ता उदयाला आल्या. टिपूचा पराभव करून इंग्रजांनी द. भारत गिळंकृत करेपर्यंत मुसलमानांची सत्ता दक्षिणेत कायम राहिली.

**बहामनी राजवट :-**

उत्तरेत महंमद तुघ्लकाची सत्ता चालू असतांना त्याने आपली राजधानी दिल्लीहून दौलताबादला हलवली. आपल्या राज्याच्या सीमा विस्तारल्या. पण काही काळाने त्याच्या दक्षिणेतल्या सरदारांनी बंड केलं. सुरुवात गुजराथपासून झाली. त्याची लागण मग दौलताबादलाही झाली. तुघ्लकाने ते बंड मोडून काढलं, तेव्हा सर्व सरदार हसन गंगू बहामनीकडे आले आणि त्यांनी त्याला राज्य सांभाळायला सांगितलं. या हसनचे गुरु गंगू नावाचे एक ब्राह्मण होते म्हणून त्याने आपलं नाव हसन गंगु बहामनी असं घेतलं. बहामनी म्हणजे ब्राह्मण. **बहामनी सल्तनत १३४७ ते १४८९ च्या जवळपास पर्यंत चालू राहिली. त्यानंतर तिचे पाच तुकडे झाले. अहमदनगरची निजामशाही, विजापूरची आदिलशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही, बिदरची बरीदशाही, आणि वऱ्हाडची इमादशाही.**

**निजामशाही** :- याचा संस्थापक मलिक अहमद. १४९० मधे या राजवटीला सुरुवात झाली. त्याने वसवलेलं गाव म्हणजे अहमदनगर. या राजवंशात चांदबिबीने आपल्या पराक्रमाने आपलं नाव इतिहासाच्या पटलावर लिहिलं. हिचा जन्म इ.स. १५५० मधे झाला. विजयनगरशी लढायचा मनसुबा ठरल्यावर निजामाने विजापूरच्या आदिलशहाशी संबंध दृढ करण्यासाठी आपली मुलगी चांदबिबी त्याच्या मुलाला, अलि आदिलशहाला दिली, आणि त्याची मुलगी आपल्या मुलाला करून घेतली. त्यामुळे चांदबिबीचा दोन्ही घराण्याशी संबंध होता. तिचं आयुष्य मोठं नाट्यपूर्ण होतं. चांदबिबीचं खरं नाव खानजादा हुमायूँ सुलताना. हिला अरेबिक, फारसी, कानडी, मराठी भाषा उत्तम प्रकारे येत. शिवाय ती सतार वाजवण्यातही प्रवीण होती. चित्रंही उत्तम काढायची.

तिच्या पतीचा, अलि आदिलशहाचा मृत्यू झाल्यावर, तिच्या पुतण्याला गादीवर बसवून कमालखान नावाच्या अधिकाऱ्याने आपल्या हातात सत्ता बळकावली. आणि तो चांदबिबीशी फटकून वागू लागला. म्हणून चांदबिबीने त्याला सत्तेवरून दूर करण्याच्या हालचाली सुरू केल्या. तिने हाजी किश्वरखानाला जवळ करून कमालखानावर हल्ला केला. कमालखानाचा शिरच्छेद करुन तिने आपल्या हातात कारभार घेतला. पण त्यामुळे किश्वरखान प्रबळ झाला. त्याला बाजूला करण्यासाठी तिने आता बंकापूरच्या मुस्तफाखानाला हाताशी धरून किश्वरवर चढाई केली. पण त्याआधीच किश्वरखानाला त्याच्या गुप्तहेरांकडून या बातमीचा सुगावा लागला. त्याने लगेच मुस्तफाखानाला पकडून ठार केलं. चांदबिबीने केलेल्या हल्ल्यात ती पकडली गेली आणि किश्वरखानने तिला सातारच्या तुरुंगात बंदीवासात ठेवलं. त्यानंतर इखलासखान नावाच्या हबशाने आपल्या दोन साथीदारांसह किश्वरवर चढाई केली. त्यात किश्वरखानला पळून जावं लागलं. तो गोवळकोंड्याच्या आश्रयाला गेला. तिथे मुस्तफाखानाच्या नातेवाईकाने त्याचा खून केला आणि सत्तांतराच्या या घडोघडी बदलणाऱ्या नाट्यप्रयोगात एक पात्र कमी झालं. त्यानंतर मात्र चांदबिबीच्या हातात सत्ता आली.

चांदबिबीचा पुढचा मोठा लढा मोगल सम्राट अकबराशी झाला. तिने त्याच्याशी शूरपणे लढा दिला. निजामशाही घशात घालायला अकबराकडून मोठ्या फौजांनी सरदार येतच राहिले. अकबरने प्रथम आपला मुलगा मुराद आणि माळव्याचा सेनापती खानखानान याला पाठवलं. पण चांदबिबीने मोठ्या पराक्रमाने नगरचा किल्ला लढवला, शेवटी वेढा उठवण्याच्या बदल्यात वऱ्हाडचा प्रदेश मिळवून मुराद निघून गेला. सम्राट अकबरला हा तह बिलकुल आवडला नाही. त्याने मग आपला मुलगा दानियलला अहमदनगर जिंकायला पाठवलं. आणि तो स्वतः बऱ्हाणपूर ओलांडून नगरच्या बाहेर छावणी करून राहिला. चांदबिबीने विजापूर आणि गोवळकोंड्याच्या फौजा आपल्या मदतीला बोलावल्या. गोदावरीच्या तीरावर दोन्ही दोन्ही फौजांचा तळ पडला आणि भीषण युध्दाला सुरवात झाली. चांदबिबी अत्यंत शौर्याने लढत राहिली. चांदबिबी अहमदनगर किल्ल्याचचं रक्षण प्राणपणाने करत होती. तिच्या मृत्यूबद्दल वेगवेगळे प्रवाद आहेत.  एक आहे तो म्हणजे, आपला पराभव दिसू लागला तेव्हा तिने बोलणी करण्याचा प्रस्ताव मोंगलांपुढे ठेवला. हा तिचा हा निर्णय न आवडून तिचा रक्षक जीताखान याने,  चांदबिबी शत्रूला सामील झाली आहे अशी अफवा उठवली. तेव्हा चिडलेल्या तिच्या फौजेनेच तिचा प्राण घेतला. दुसरा प्रवाद म्हणजे, चांदबिबीच्या सरदारानेच अकबराला फितूर होऊन नगरमधे मोगल फौजांना दार उघडलं, त्यात ती मारली गेली. ही लढाई इ. स. १५९९ मधे झाली. **थोडक्यात चांदबिबीनंतर अहमदनगर अकबराच्या साम्राज्याचा भाग बनलं.**

**आदिलशाही** :- विजापूरच्या युसुफ अलिने आदिलशाहीची स्थापना केली. १४९० मधे या राज्याची स्थापना झाली आणि औरंगजेबाने आपल्या कारकीर्दीत या राज्याला आपल्या साम्राज्याला जोडून घेऊन या राजवंशाचा शेवट केला. याच आदिलशहाच्या दरबारातून अफझलखान शिवरायांना संपवायला विजापूरहून निघाला. आणि शिवरायांच्या वाघनखांमुळे आणि अचाट पराक्रमामुळे प्रतापगडावर पैगंबरवासी झाला. आदिलशाहीला १६८६ मधे औरंगजेबाने जिंकून घेतलं आणि ह्या घराण्याचा अंत झाला.

**कुतुबशाही** :- कुतुब-उल्-मुल्क ह्याच्यापासून कुतुबशाहीला सुरुवात झाली. हैद्राबाद ही त्याची राजधानी, आणि गोवळकोंड्याचा प्रसिध्द किल्ला ही या राज्याची ओळख**. इ.स. १६८७ मधे औरंगजेबाने गोवळकोंडा सल्तनत आपल्या साम्राज्याला जोडून घेतलं.**

**बरीदशाही** :- अमीर कासिम बिदर हा या राज्याचा संस्थापक.

**इमादशाही** :- इमाद-उल-मुल्क याच्यापासून ही राजवट सुरू झाली. **पण लवकरच अहमदनगरने यांच्यावर हल्ला करून वऱ्हाडचा मुलुख आपल्या राज्याला जोडला.**

**विजयनगर साम्राज्य :-**

मुसलमानी सुलतान सर्व भारताला कालसर्पासारखी हळूहळू गिळत असतांना हिंदू धर्माला वाचवण्यासाठी आणि हिंदूंची सत्ता जिवंत ठेवण्यासाठी विद्यारण्यस्वामींनी हरिहर आणि बुक्क या दोन राजपुत्रबंधूंना हाताशी धरून विजयनगर साम्राज्याची स्थापना केली. हरिहर आणि बुक्क यांना जुलमाने मुसलमान केलं होतं, स्वामींनी त्यांना परत हिंदू धर्मात आणलं. इ.स. १३३६ मधे या सत्तेची स्थापना झाली. विजयनगर समृध्द व्हायला लागलं. त्याचा राज्यविस्तार प्रचंड वाढला. तेव्हा पाचही शहांना विजयनगरचा उत्कर्ष सलायला लागला. आदिलशहा, निजामशहा, गोवळकोंडा सुलतान, सगळे एकत्र झाले आणि त्यांनी विजयनगरचा अंत करायचे कट सुरू केले. त्यावेळी म्हणजे इ. स. १५४२ मधे विजयनगरवर नाममात्र राजा सदाशिवराय गादीवर होता, आणि सत्ता एकवटली होती ती रामरायांच्या हाती. रामरायांच्या कानावर शहांच्या कुटील

कारस्थानांची बातमी आली. त्यांनीही जोरात तयारी सुरू केली. लढाईला काहीतरी कारण हवं म्हणून आदिलशहाने रामरायाकडे दूत पाठवला आणि काही किल्ल्यांची मागणी केली ती अर्थातच रामरायाने धुडकावून लावली. आणि सर्व शहांना विजयनगरवर हल्ला करण्याचं निमित्त मिळालं. ५० हजार धोडदळ, ३ हजार पायदळ, २ हजार हत्ती, आणि १ हजार लहान तोफा एवढा युध्दसरंजाम घेऊन सगळे शहा विजयनगरवर आले. रामरायानेही आपल्या सर्व मांडलिकांना आपल्या फौजेसह बोलावलं. ७० हजार घोडदळ, ९० हजार पायदळ, २००० हत्ती, आणि १ हजार कनिष्ठ प्रतीच्या तोफा, एवढ्या सरंजामासह हा हिंदू विरुध्द मुसलमान लढा कृष्णेच्या तीरावर सिध्द झाला. रामरायाचा भाऊ तिरुमल, कृष्णेच्या तीरावर फौजांना अडवायच्या कामावर दाखल झाला.

रामरायाने कृष्णेच्या उतारावरच्या सर्व जागांवर बंदोबस्त उत्तम केला. आणि शत्रूच्या फौजांना तिथेच अडवायचं ठरवलं. मुसलमान फौजा तिथे आल्यावर अडल्या. म्हणून त्यांनी नवीन युध्दनीती अवलंबली. सर्व फौजा उत्तरेकडे धावायला लागल्या, तेव्हा त्यांच्या पाठलागावर रामरायाच्या फौजाही उत्तरेकडे त्यांच्या पाठलागावर गेल्या. तीन दिवस सतत घोडदौड करून शहांच्या फौजा त्या रात्री गुप्तपणे उलट्या फिरल्या आणि एका रात्रीत तीन दिवसांचा प्रवास करून परत पहिल्या ठिकाणी नदीच्या उतारावर आल्या. तोपर्यंत रामरायाच्या फौजांपैकी कुणीच तिथे नव्हतं. त्यामुळे विनासायास त्यांनी नदी ओलांडली. रामरायाला हे कळल्याबरोबर त्याने सेनेची जमवाजमव केली.

राक्षस आणि तागडी या दोन खेड्याच्या परिसरात ५ जानेवारी १५६५ च्या मध्यान्हाला तुंबळ युध्दाला तोंड लागलं. शत्रूने आघाडीला अजस्त्र तोफा, त्यामागे लहान तोफा, तिसरी रांग फिरत्या तोफांची अशी रचना केली. आणि त्या तोफा लपवण्यासाठी तोफांच्या रांगांच्या पुढे २००० सैनिक उभे केले गेले. दोन्हीकडचे सैनिक भिडले. युध्द जोरात सुरू असतांना ८० वर्षाचा रामराय पालखीत बसून रणांगणावर हिंडत होता. त्यातच रामरायाच्या भावाला तिरुमलला प्राणांतिक जखमा झाल्या. शत्रूच्या तुफानी हल्ल्यामुळे रामरायांच्या फौजा पळून जाऊ लागल्या तेव्हा रामरायाने स्वतः पालखीतून सैनिकांना प्रोत्साहन द्यायला सुरुवात केली. त्यांना पैशाची लालुच दिली गेली, तेव्हा सर्व लष्कर परत लढायला लागलं. पण शत्रूच्या तोफखान्याच्या माऱ्यापुढे सगळं लष्कर धारातीर्थी पडायला लागलं. तिरुमलचा मुलगा जबर जखमी झाला. त्याला रणांगणावरून हलवण्यात आलं.

जखमी आणि पळणाऱ्या सैनिकांना प्रोत्साहन द्यायला रामराय स्वतः पालखीतून रणांगणावर हिंडत होता. इतक्यात एक पिसाळलेला हत्ती शत्रूच्या गोटातून रणांगणावर वेडापिसा होऊन धावायला लागला, तेव्हा रामरायाच्या भोयांनी पालखी टाकून तिथून पळ काढला. रामराया पकडला गेला. निजामशहाने त्याचा शिरच्छेद केला. रामरायाचे शीर भाल्यावर अडकवून तो भाला उंच धरण्यात आला. आपल्या धन्याचं शीर पाहून रामरायाच्या फौजेने रणांगणावरून पळ काढला. आणि **एका हत्तीमुळे विजयनगर साम्राज्याचा अंत झाला. या सत्तांतराने भारताचा इतिहास बदलला. भारतभर मुसलमानी सत्तेचे काळे ढग पसरून हिंदूंचं अंधःकारमय जीवन सुरू झालं. राजकारणाच्या प्रवाहाला मिळालेली ही कलाटणी दुःखदच झाली.**

**वोडियार :- ओडियार.**

विजयनगर अमदानीत राजांनी आपल्या राज्यावर ठिकठिकाणी सुभेदार नेमले होते. विजयनगर लयाला गेल्यावर हेच राजे झाले. त्यातलं नावाजलेलं राजघराणं वोडियार राजाचं. या वोडियार शब्दातला व चा उच्चार करायचा नसतो त्यामुळे ओडियार हा योग्य उच्चार आहे. दक्षिणेतलं हे समृध्द हिंदू राष्ट्र.

इ. स. १३९९ मधे मैसूर भागाचा यदुराज नावाचा अधिकारी होता. तोच ओडियार घराण्याचा संस्थापक. हळूहळू त्याने  आणि पुढच्या वारसांनी आपल्या प्रदेशाचा विस्तार केला. १५६५ मधे विजयनगर साम्राज्याचा अंत झाल्यावर ओडियार घराणं स्वतंत्र झालं. १९४७ पर्यंत हे घराणं राजवैभव भोगत होतं. त्यानंतर स्वतंत्र हिंदुस्थानात ते विलीन झालं.

**इ. स. १७६१ ते १७९९ पर्यंत या ओडियार घराण्यात सत्तापालट झाला.** हैदरअली नावाच्या एका, पायदळात साधा शिपाई असलेल्या शिपायाने आपल्या बुध्दीप्रभावाने, कूट राजकारणाने आणि महत्वाकांक्षेने मैसूरच्या राजाला कैदेत टाकून सत्ता काबीज केली. इतिहास त्याला हैदरनाईक या नावानेच ओळखतो. त्याचे वडीलही लष्करातच होते. त्यांचं निधन झाल्यावर हैदर आपल्या मामाकडे येऊन लष्करात भरती झाला. आपल्या हुशारीवर आणि पराक्रमावर तो प्रगती करत वरचे हुद्दे चढत गेला. त्याकाळात स्वराज्यात नानासाहेब पेशवे सत्ता गाजवत होते. मराठ्यांच्या वरचेवर स्वाऱ्या कर्नाटकात होऊ लागल्या. त्यावेळी हैदरच्या मुत्सद्दीपणाला नवी उभारी मिळाली.

ओडियार राजा कृष्णराज याला आपल्या कूट राजनीतीने तुरुंगात डांबून त्याने सत्ता आपल्या हाती घेतली. हैदरच्या या सत्ताकाळात दक्षिणेत इंग्रजांचा जोरही वाढायला लागला होता. १७६१ मधे नानासाहेब पेशव्यांचा मृत्यू होऊन माधवराव पेशवे सत्तेत आले होते. त्यामुळे हैदर आणि माधवराव पेशव्यांचा एकमेकांविरुध्द सामना रंगला. अनेक लढाया दोघांच्यात झाल्या. हैदर पराक्रमी तर होताच पण युध्दशास्त्रातही फार कुशल होता. धूर्त आणि कावेबाजही होता. त्याच्यातलं आणि शिवरायांच्यातलं एक कमालीचं साम्य म्हणजे हैदरनेही बैलांच्या शिंगांना पलिते बांधून मराठ्यांच्या सेनेचा ‘‘ कात्रज ‘‘ केला होता. हैदरने आपल्या कुशाग्र बुध्दीने इंग्रजांची तांत्रिक सामुग्री वापरली आणि गनिमीकाव्याचाही वेळ पडेल तसा वापर केला.

गोपाळराव पटवर्धन आणि त्र्यंबकमामा पेठ्यांच्या हाताखाली, मराठ्यांच्या फौजेचा श्रीरंगपट्टणाच्या जवळच्या मेलुकोटे पर्वतरांगांमधे संग्राम सुरू झाला तेव्हा मराठ्यांच्या फौजेने हैदरला वेढलं. आपण वेढले गेलो आहोत हे कळल्यवर हैदर गुपचुप मध्यरात्री आपल्या तळावरून निघाला पण मराठी फौजेला त्याचा सुगावा लागला आणि धमासान लढाई दोन्ही फौजांमधे सुरू झाली. अशावेळी केवळ नियतीच्या संकेतामुळे हैदर वाचला. त्याच्या एका विश्वासू शिपायाने त्याला आपला घोडा देऊन त्याला सुखरूप बाहेर काढलं. भिकाऱ्याच्या वेशात हैदर निसटला आणि  श्रीरंगपट्टणाला पोचून एका मशिदीत आपल्या पुत्राची, टिपूची वाट पाहू लागला. टिपूही थोड्याच वेळात येऊन आपल्या बापाला उराउरी भेटला. टिपूला वाचवून नियतीने मराठ्यांकडचा एक मोठा सरदार ..पटवर्धन कुळातला एक शूर, कुरुंदवाड शाखेच्या नीलकंठला उचलला.

इ. स. १७८२ मधे हैदर मृत्यू पावला. ( बहुतेक कर्करोगाने ) हैदरच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा टिपू सुलतान गादीवर आला. २० नोव्हेंबर १७५० हा त्याचा जन्मदिवस. सत्ता हातात आल्यावर त्याचे आणि इंग्रजांचे खटके उडायला लागले. अत्यंत शूर, अत्यंत महत्वाकांक्षी, आणि राज्यविस्ताराच्या कल्पनेने भारलेला, भारतदेश मुसलमानांचा करण्याच्या भावनेने लाखो लोकांना बाटवणारा, टिपू इंग्रजांची झोप उडवणारा होता. टिपू इंग्रजांचा सत्ता काबीज करण्याचा डाव ओळखून होता. त्यामुळे तो इंग्रजांना बाहेर घालवून देण्याच्या ईर्षेने झपाटलेला होता. पण त्याच्या या अतिरेकी, घमेंडी स्वभावामुळेच हिंदू आणि इंग्रज हे दोघेही त्याचे शत्रू बनले. मराठ्यांनाही त्याने खूप दुखावलं. नरगुंदच्या भाव्यांना खूप छळून त्यांचा अंत घडवला. यामुळे मराठेही त्याच्याविरुध्द गेले. **टिपूला युध्दात वापरल्या जाणाऱ्या रॉकेटचा जनक मानले जाते. ( टिपूची सत्ता संपवल्यावर इंग्रजांनी या रॉकेटमधे आणखी सुधारणा करून नेपोलियनविरुध्द ही रॉकेटस् वापरली )**

टिपूने इंग्रजांना घालवण्यासाठी फ्रान्स, अफगाणिस्तान आणि टर्कीच्या राजसत्तांशी इंग्रजांविरुध्द लढायला हातमिळवणी करण्याची महत्वाकांक्षी योजना आखली. नेपोलियन आणि त्याचा एकमेकांना साथ देण्याचा प्रस्ताव असलेला

पत्रव्यवहार इंग्रजांच्या हाती लागल्यावर ते सावध झाले आणि टिपूची सत्ता उखडण्याची योजना इंग्रजांना आखावीच लागली. मुंबईच्या फौजा आणि रिचर्ड आणि आर्थर वेलस्ली या दोन बंधूंच्या हाताखाली ३० हजार फौज श्रीरंगपट्टणकडे १७९९ मधे चालायला लागली. त्यात भर पडली ती निजामाच्या आणि मराठ्यांच्या फौजेची. अशी ५० हजार फौज श्रीरंगपट्टणच्या टिपूच्या किल्ल्याला वेढा घालायला पोचली. तेव्हा टिपूची फौज होती ३० हजार. त्याला फ्रेंचांकडून मदतीची अपेक्षा होती पण नेमकी तेव्हांच फ्रेंच राज्यक्रांती झाली. ती झाल्यानंतर नेपोलियन लढायांमधे अडकला आणि टिपूला फ्रेंचाची मदत आली नाही.

**४ मे १७९९**. किल्ल्याभोवती इंग्रजांनी म्हणजे शत्रूने वेढा घातला होता. त्यादिवशी सकाळी टिपूच्या ज्योतिषांनी आजचा अमावास्येचा दिवस त्याच्यासाठी अत्यंत अशुभ असल्याचं सांगितलं. दुपारी १२ ते २ वाजेपर्यंत त्याने काहीही घातक न करण्याबद्दल ज्योतिषांनी त्याला सुचवलं. सकाळी ९ वाजता टिपूने अशुभ ग्रहांवर उतारा म्हणून मोठा दानधर्म केला. टिपूच्या फ्रेंच युध्द सल्लागाराने टिपूला एवढ्या मोठ्या सैन्याबरोबर लढण्यापेक्षा आत्ता अज्ञातवासात जाऊन संधी मिळेल तेव्हा फिरून राज्य मिळवण्याची विनंती केली. पण टिपूने ती झिडकारली आणि म्हणाला.. **..' हजार वर्षे कोल्ह्याचं आयुष्य जगण्यापेक्षा एक दिवस वाघाचं आयुष्य जगणं मी पत्करीन. ' आणि मग तो लढायला सिध्द झाला.**

त्याने घोड्यावर स्वार होऊन, तटबंदीवरुन फिरून शत्रूच्या फौजेची पाहणी केली. किल्ल्याच्या वायव्येला असलेल्या दरवाजाची पहाणी केली. तिथे काही भगदाडं होती ती ताबडतोब आपल्या लोकांना बुजवायला सांगितली. या बाहेरील तटावर टिपूचा विश्वासू सईद जाफर रक्षणासाठी होता. तेवढ्यात टिपूच्या गुप्तहेरांनी बातमी आणली की आजच दिवसा किंवा रात्री किल्ल्यावर हल्ला करण्याची योजना इंग्रजांनी आखली आहे. टिपूला दिवसा हल्ल्याची शक्यता अजिबात पटली नाही.

तोपर्यंत वायव्येच्या दरवाजाबाहेरच शत्रूचा फार मोठा जमाव जमला होता. आणि गोळीबार बाहेरून सुरूही झाला होता. तेवढ्यात सईद मारला गेला. ही बातमी टिपूला मिळाली. सईदच्या जागी मीर कासीमची नेमणूक करुन त्याने फौजेला हुरूप देण्यासाठी, आमच्या किल्ल्याच्या भिंती मेणाच्या नाहीत असं सांगून तो तटावरून पाहणी करायला आपल्या ब्लंडरबस्ट आणि फ्युसाईल बंदूका घेऊन निघाला. समोरून येणाऱ्या फौजेतल्या लोकांना त्याने ठारही केलं. आणि मग तो आतल्या तटबंदीवरून आतल्या भागात यायला निघाला. भिंतीतून काढलेल्या चोर दरवाजाने तो आत यायला लागला तर फौजेची तिथे गर्दी उसळली होती. टिपू आत आला तो १ वाजण्याचा सुमार होता. म्हणून टिपूने जेवायचं ठरवलं. त्याचा एक घास खाऊन होतो न होतो तोच आतल्या तटबंदीच्या दरवाजाबाहेर मोठा गलका त्याने ऐकला. जेवण तसंच टाकून त्याने आपल्या बंदुका हातात तलवार घेतली आणि लढायला तो घोड्यावर स्वार झाला. त्याच्या बरोबर त्याचा विश्वासू राजन खानही होता.

तेवढ्यात ब्रिटीश फौजा आतल्या तटबंदीच्याही आत शिरल्या होत्या. त्यांच्या एका सैनिकाने मारलेल्या गोळीमुळे टिपूच्या उजव्या खांद्याला जखम झाली. पाठोपाठ आणखी दोन गोळ्या त्याच जखमेच्या खाली लागल्या. घोड्यावर बसलेल्या टिपूचा पाय रिकीबीतून राजन खान काढत असतांनाच या गोळ्या लागल्या. टिपू, राजन खान आणि घोडा, तिघेही धरणीवर पडले. तेव्हा टिपूला त्याच्या साथीदारांनी पालखीत नेऊन बसवलं.

जखमी, श्रमलेला, थकलेला टिपू दोन क्षण स्वस्थ बसला असतांनाच एका इंग्रजाने त्याच्या तलवारीची सोन्याची मूठ आणि जवाहीर पाहून त्या लोभाने त्याच्याजवळ जाऊन त्यावर हल्ला केला. टिपूने त्याही जखमी अवस्थेत त्याला मारलं, तेव्हा दुसरा इंग्रज पुढे आला. त्याने मारलेली गोळी टिपूच्या उजव्या बाजूला कपाळात शिरली आणि कानाखाली जाऊन अडकली.

त्या क्षणी, दुपारी २ वाजता टिपूचा  अंत झाला. संध्याकाळी इंग्रजांना इतर अनेक मृत सैनिकांच्या कलेवरांमधे त्याचा देह सापडला आणि जवळच पालखीखाली अडकलेला मृत राजनखानही दिसला. ५ मेला मोठ्या इतमामाने इंग्रजांनी त्याचा दफनविधी हैदरच्या थडग्याशेजारीच केला. त्या दफनविधीच्या वेळी उपस्थित असलेल्या जनतेने ऐन मे महिन्यात न भूतो, न भविष्यति असा धो धो कोसळणारा पाऊस आणि वादळी वारे अनुभवले.

वेलस्ली बंधूंचा इंग्लंडच्या सरकारने बक्षिसे देऊन सत्कार केला.  **इंग्रजांनी मैसूर राज्य आपल्या ताब्यात घेऊन गादीवर परत ओडियार वारसाची स्थापना केली. आणि ४० वर्षे सत्तेबाहेर राहिलेले ओडियार परत एकदा सत्तेत आले. मैसूरच्या राजकारणाने परत आपला प्रवाह बदलला.** ओडियार राजवंशाबद्दल एक आख्यायिका सांगितली जाते. विजयनगरतर्फे तिरुमल नावाचा अंमलदार श्रीरंगपट्टणचा कारभार पाहात होता. १६१० मधे राजा ओडियारने श्रीरंगपट्टणवर हल्ला करून ते आपल्या ताब्यात घेतलं आणि आपली मैसूरची राजधानी श्रीरंगपट्टणला हलवली. त्यानंतर तिरुमल निवृत्त होऊन आपल्या तलकाडी नावाच्या गावात जाऊन राहू लागला. त्याला दोन बायका होत्या. त्यातील अलमलम्मा नावाची पत्नी, रंगनायकी देवतेची मोठी भक्त होती. तिरुमलचं निधन झाल्यावर तिने आपलं सर्व जडजवाहीर या देवतेला अर्पण केलं. तिच्याकडे असलेल्या टपोऱ्या मोत्यांची सोन्याच्या तारेत गुंफलेली नथ ती दर मंगळवारी आणि शुक्रवारी त्या देवतेला घालीत असे. आणि इतर दिवशी सर्व दागिने आपल्याकडे ठेवत असे. तिरुमलचं निधन झाल्यावर ओडियार राजाने सर्व जवाहिर तिला आपल्या स्वाधीन करायला सांगितलं. फक्त नथ तेवढी तिला ठेवून घ्यायची परवानगी दिली. आणि आपला हुकूम न मानल्यास बळाने ते ताब्यात घेतलं जाईल असा धाकही दाखवला. तेव्हां अलमलम्माने कावेरीच्या प्रवाहात आपल्या जडजवाहिराबरोबर उडी मारुन आत्महत्या केली आणि त्याआधी शापवाणी उच्चारली की ,

‘ या तलकाडी गावाचा उजाड प्रदेश होवो, (ती ज्या गावात राहात होती, त्या)  मेलंगी गावाचं नदीच्या भोवऱ्यात रूपांतर होवो आणि ओडियार घराणं निःसंतान होवो. ‘

आश्चर्य म्हणजे ओडियार घराण्यात पुढच्या नऊ पिढ्या दत्तक वारसांनी गादी चालवली. त्यातसुध्दा दत्तक घेतलेल्या मुलाला पुत्र होत असे कारण तो बाहेरच्या कुळातला असे आणि ओडियार म्हणून जन्मलेला वारस परत निःसंतान असे. आजही तलकाडी गाव वाळूने भरलेलं आहे. आणि मलंगी गावातल्या कावेरीमधे भोवरे आहेत.

ओडियार राजाला  अलमलम्माचा शाप कळल्यावर पश्चात्ताप झाला.  त्याने अलमलम्माचा पुतळा करुन आपल्या प्रासादात बसवला. देवीची पूजा त्याच प्रथेप्रमाणे चालू केली. १६१० साली मैसूरच्या सुप्रसिध्द दसरा महोत्सवाची सुरुवात झाली. नवरात्रीच्या सुरुवातीलाच त्या राजाचा मुलगा मरण पावला पण राजाच्या हुकूमाने दसरा सण परंपरेप्रमाणे थाटात साजरा झाला. या घराण्याच्या या शापाची कहाणी लोकगीतांमधून पिढ्यान् पिढ्या गायली गेली.

असे हे राजकारणातले  महाप्रतापी पुरुष काळाच्या पडद्याआड गेले की कधीकधी नवीन राजकारणाचा वेगळीच कलाटणी घेतं आणि नवीनच अंक सुरू होतो. हे पुरुष जगतात तेव्हाही ते समाजाला उन्नत करून वादळ निर्माण करतात. आणि ते जातात तेव्हाही त्यांच्या जाण्यानं परत वादळासारखीच उलथापालथ होते. त्यांनी घालून दिलेली घडी विस्कटते. राजकारणातल्या ह्या थोर पुरुषांच्या  जाण्याने तर राजकारणाचा प्रवाहच बदलतो. कधीकधी तर नवीन युगाला सुरुवात होते.

इतिहासातल्या प्रत्येक प्रसिध्द राजकारण्याचे शेवट वेगवेगळ्या पध्दतीने झाले. राजकारणाचा प्रवाह बदलला जाऊन नवीन राजवट आणायची तर सत्ताधाऱ्याचा मृत्यू अटळ असणारच. पण त्यातही त्यांचा शेवट चटका लावणारा झाला तर त्याची

जखम पिढ्यान् पिढ्या जनमानसात ठुसठुसत राहते. नाट्यपूर्ण घटनांनी मृत्यूला सामोरे गेलेले काही सम्राट आणि बादशहा अनेक झाले. त्यातूनही दिल्लीतल्या मोंगल सत्तांमधे खूनानेच शेवट होऊन नवा वारस गादीवर आला. महाराष्ट्रात मात्र फक्त राघोबादादाच्या हातून सत्तेसाठी नारायणराव पेशव्याचा खून झाला, पण ही आपली संस्कृती नव्हती.

## दिल्लीतील राजसत्ता :-

भारतातली धनसंपदा पाहून तिला लुटायला अनेक पराक्रमी भारतात आले. हे सर्व उत्तरेतून खैबरखिंडीतून प्रथम पानिपत आणि मग दिल्लीपर्यंत पोचले. त्यामुळे दिल्ली ही कायम बदलत्या राजवटींचा एक इतिहास बनली. भारतातल्या सम्राटांची राजघराणी भारताची भरभराट करत असतांना १२ व्या शतकात भारतावर परकीय अंमलाच्या शृंखला भारतमातेच्या पायात पडायला सुरुवात झाली ती पृथ्वीराज चौहान आणि महंमद घोरीच्या लढाईत, पृथ्वीराजचा पराभव झाला तेव्हापासून..

दिल्लीत बदलत गेलेल्या राजसत्ता म्हणजे

१. महंमद घोरी :- इ. स. ११९१ ते १२०६

२. कुतुबुद्दीन ऐबक :- इ. स. १२०६ ते १२१०

३. अल्तमश :- इ. स. १२१० ते १२३६.

४. रझिया सुलताना :- इ. स. १० नोव्हेंबर १२३६ ते मे १२४०.

५. मोईउद्दीन बेहराम ( रझियाचा सावत्र भाऊ ) :- इ. स. १२४० ते १२६५

६. बलबन गियासुद्दीन :- इ. स. १२६६ ते १२८७. त्याच्यानंतर त्याचा नातू कैकाबाद गादीवर आला पण जलालुद्दीन खिलजी या सेनापतीने त्याचा खून केला आणि गादी बळकावली.

७. जलालुद्दीन खिलजी :- १२९० ते इ. स. १२९६

८. अल्लाउद्दीन खिलजी :- इ. स. १२९६ ते १३१६.

९. अल्लाउद्दीन नंतर त्याचा सेनापती मलिक काफरने सत्ता आपल्या हाती घेतली. अल्लाउद्दीनच्या वारसांची वाताहत झाली आणि तुघलक घराण्याला प्रारंभ झाला.

१०.गियासुद्दीन तुघलक :- इ. स. १३२१ ते १३२५.

११. महंमद तुघलक :- इ. स. १३२१ ते १३५१. इ. स. १३४७ मधे दक्षिणेत तुघलकाचा सरदार हसन गंगू बहामनीच्या हाती दक्षिणेचा कारभार एकवटला.

१२. फिरोजशहा तुघलक. :- इ. स. १३५१ ते १३८८.

१३. तैमूरलंगाने १४१३ मधे दिल्लीवर स्वारी करुन तुघलक घराणं संपवलं. पण राज्य केलं नाही.

१४. बाबर :- २१ एप्रिल १५२६ ला पानिपतला इब्राहिम लोदी अणि १७ मार्च १५२७ ला कनवाला राणा संगचा पराभव करून पहिला मोगल सुलतान म्हणजे बाबर. याने जो आपल्या वंशाचा राजसत्तेचा पाया घातला तो इंग्रजांनी बहादूरशहा जफरचा पराभव करेपर्यंत टिकला. याच्या वंशात त्याचा मुलगा हुमायूँ ( १५३०-१५५६ )– अकबर (१५५६ ते१६०५ )- जहाँगीर (१६०५ ते १६२६ )– शहाजहाँ (१६२८ ते १६५८ ) – औरंगजेब ( १६५८ ते १७०७ ) असे एकापेक्षा एक समर्थ इतिहास निर्माण करणारे बादशहा झाले.

**पृथ्वीराज चौहान :-**

भारतात, महंमद घोरीशी झालेल्या लढाईत ज्याच्या पराभवानंतर मुसलमानी अंमल सुरू झाला तो म्हणजे पृथ्वीराज चौहान. हा सोमेश्वर आणि कर्पूरदेवीचा पुत्र. सोमेश्वर हा अजमेरचा राजा. आपल्या आजोबांकडून, राजा अनंगपालकडून (दुसरा ) पृथ्वीराजला दिल्लीची गादीही मिळाली. कनोजचा राजा जयचंद हा पृथ्वीराजचा मावसभाऊ. पृथ्वीराजच्या वाढत्या प्रभावामुळे जयचंदचा मत्सर वाढत चालला होता.

जयचंदने आपल्या कन्येचं संयोगितेचं स्वयंवर ठरवलं, तेव्हा पृथ्वीराजला मुद्दाम आमंत्रण दिलं नाही. संयोगितेलाही पृथ्वीराजशी लग्न करायचं होतं. तेव्हा पृथ्वीराज वेषांतर करून तिथे पोचला. त्याच्या बरोबर त्याचा जिवलग मित्र चंदवरदाई हाही होता. संयोगिताला हे माहीतही होतं पण तिला तो स्वयंवराच्या ठिकाणी दिसला नव्हता. संयोगिता स्वयंवराच्या वेळी एकेक वर नाकारत दाराशी आली. जयचंदने पृथ्वीराजला हिणवण्यासाठी मुद्दाम पहारेकऱ्याच्या जागी तिथे पृथ्वीराजचा पुतळा ठेवलेला होता, त्या पुतळ्याला तिने माळ घातली. आणि लोकांच्या डोळ्यांचं पातं लवतं न लवतं तोच पृथ्वीराज प्रगट झाला आणि संयोगिताला घोड्यावर घालून वायुवेगाने निघून गेला. त्यानंतर दोन्ही भावांमधलं वैर आणखीनच वाढलं, आणि त्याचाच परिपाक म्हणजे जयचंदने शहाबुद्दीन महंमद घोरीला पृथ्वीराजवर आक्रमण करायला चिथावलं.

घोरीच्या आधी गझनीचा महंमद वरचेवर भारताला लुटून गेला होता. या महंमदचा बाप सुबक्तगीन हा गुलाम होता. गझनीच्या सुलतानाने, अलप्तगीनने, सुबक्तगीनला गुलामांच्या बाजारातून विकत घेतलं होतं. सुबक्तगीन फार भला माणूस होता, पण त्याच्या मुलाने, महंमदने मात्र सोमनाथावर, गुजरातवर स्वारी करून खूप दौलत लुटून नेली. तो फार क्रूर, लोभी होता. एकदा तो कच्छचं वाळवंट तुडवत आला आणि मग लाहोरवरून भारतात शिरला. गझनीचा महंमद मेल्यावर त्याच्या मुलांमधे भांडणं लागली. त्याचा फायदा घेऊन महंमद घोरीने सत्ता मिळवली. आता घोरी राजवट गझनीत सुरु झाली.

पृथ्वीराजाने सात वेळा घोरीला पराभव करून हाकलून लावलेलं होतं. पण इ.स. ११९१ – ९२ मधे दिल्लीच्या उत्तरेला कुरुक्षेत्राजवळ असलेल्या तरोरीला ( तरायन हे नावही प्रचलीत आहे ) अजमेरचा राजा पृथ्वीराज चौहान आणि शहाबुद्दीन महंमद घोरीमधे झालेली लढाई, दिल्लीतल्या परकी अंमलाला कारण झाली. दरवेळची हार पाहून घोरीने फसवणुकीचा मार्ग अवलंबला. मी लढण्यासाठी आलो नाही, असं सांगत, त्याने शेवटी मदतीचा सलुखाचा हात पुढे करून पृथ्वीराजला आश्वस्त केलं. पृथ्वीराजचं सैन्य गाफील राहिलं. त्याचा फायदा घेऊन घोरी दुसरे दिवशी पहाटे आपल्या अश्वदळासह पृथ्वीराजाच्या तळावर पोचला. त्याच्या अचानक हल्ल्याने भानावर आलेले हिंदू सैनिक लगेच घोड्यावर स्वार होऊन लढाईला बाहेर पडले. अचानक येऊनही फारसा फायदा झाला नाही हे पाहून, आणि पृथ्वीराजचं सैन्य पाहून घोरीने आपल्या सैन्याचे पाच भाग केले आणि शत्रूला पुरतं कोंडून टाकलं. घोरी लढाई जिंकला, पृथ्वीराजला कैद केलं, आणि दिल्लीवर कब्जा मिळवला. पृथ्वीराजचा मावसभाऊ जयचंदने घोरीला मदत केली. पृथ्वीराजला हरवून महंमद घोरी रणजित

दरवाजाने दिल्लीत शिरला, त्या दरवाजाला नंतर गझनी दरवाजा या नावाने ओळखलं जाऊ लागलं. नंतर घोरीने जयचंदच्या कनोजवरही चढाई केली आणि तेही लुटलं. **उत्तर भारतात मुसलमानी राजवटीचा पाया घातला गेला.** पृथ्वीराजाच्या मृत्यूबद्दल एक आख्यायिका आहे. तरोरीला झालेल्या लढाईत पराभूत पृथ्वीराजाला घेऊन घोरी गझनीला गेला. तिथे गेल्यावर त्याने पृथ्वीराजचे डोळे काढून त्याला कैदेत टाकलं. घोरीच्या पाठोपाठ राजाचा मित्र चंदवरदाईही तिथे वेषांतर करून पोचला. तिथे गेल्यावर चंदवरदाईने अनेक युक्त्या करत घोरीचा विश्वास जिंकून घेतला, आणि एक दिवस पृथ्वीराजला ठेवलेला कैदखाना शोधून काढून त्याला भेटला.

पृथ्वीराज शब्दवेधाने तीर मारण्यात फारच निपुण होता. म्हणजे अगदी दुसरा अर्जुन म्हणायला हरकत नाही. चंदवरदाईने मुद्दाम तीरंदाजीची स्पर्धा राजाला घ्यायला लावली. आणि पृथ्वीराजला त्यात भाग घ्यायला लावला. स्वतः घोरी उंच आसनावर बसला होता. मग आंधळ्या पृथ्वीराजला पटांगणात आणण्यात आलं. चंदवरदाईने पृथ्वीराजला ऐकू जाईल असा एक दोहा म्हटला,

चार बांस, चौबिस गज, अंगुली अष्ट प्रमान ।ता उपर सुलतान है । मत चुके चौहान ।

दोहा ऐकल्यावर सिंहासनाच्या अंतराचा अंदाज घेत, पृथ्वीराजने तीर मारला, आणि घोरीचं मस्तक धडावेगळं झालं. तो इतका निपुण शब्दवेधी नेमबाज होता. राजाच्या सैनिकांनी दोघांना अटक केली. पण तुरूंगात असतांना चांदवरदाई आणि पृथ्वीराजने एकमेकांवर प्राणघातक हल्ला करवून आपला जीवनप्रवास संपवला. महंमद घोरी कुतुबुद्दीन ऐबकच्या हाती सत्ता देऊन गझनीला जात असतांना, आताच्या पाकिस्तानात सोहावा गावाजवळ, इ. स. १२०६ मधे १५ मार्चला संध्याकाळी नमाज म्हणत असतांना त्याचा खून झाला.

**महंमद घोरीनंतर दिल्लीवर गुलाम घराण्याची राजवट सुरू झाली. चार वर्षांनंतर राज्य करून, गुलाम म्हणून विकत घेतलेल्या कुतुबुद्दीन ऐबकला त्याने कारभार सांभाळायला ठेवलं ( जून १२०६ ते १० )आणि तो निघून गेला. कुतुबुद्दीन ऐबक आपल्या घोड्यावरून चौगुना नावाचा खेळ खेळत असतांना घोड्यावरुन पडला आणि त्यातच त्याचा अंत झाला.**

**ऐबकनंतर त्याचा जावई अल्तमश ( १२१० ते १२३६ ) गादीवर आला.** ऐबकच्या मुलांना मागे सारुन अल्तमशने तखत काबीज केलं. हा अल्तमशही गुलामांच्या बाजारात विकत घेतलेला होता. तो लहान असतांना त्याच्या सावत्र भावांनी त्याला विकून टाकलं होतं. एकदा, बाजारात द्राक्षं विकत घेण्यासाठी तो उभा असतांना त्याचा खिसा फाटल्यामुळे त्याला पैसे देता आले नाहीत म्हणून तो रडायला लागला. तेव्हा एक फकीर त्याच्याजवळ आला, त्याने द्राक्षं घेऊन दिली आणि त्या छोट्या मुलाने पुढे केलेला हात पाहून म्हणाला की एक दिवस तुझ्या डोक्यावर ताज असेल. पुढे हा मुलगा घोरीच्या दरबारात गुलाम म्हणून विकला गेला. आपल्या हुशारीवर हा गुलाम वर चढत गेला. त्या गुलामाचं नाव होतं, इल्तिमश. लोक त्याला म्हणायला लागले.. अल्तमश. त्याच्या हुशारीवर खूष होऊन कुतुबुद्दीनने नंतर त्याला जावई करून घेतलं होतं. अल्तमशने राज्याचा कारभार जनतेला सुखावह वाटेल असा केला. त्याचा मृत्यू वृध्दापकाळामुळे झाला.

**अल्तमशनंतर राजसत्तेला कलाटणी मिळाली नाही, पण पूर्वापार प्रथेला मात्र अचानक कलाटणी मिळाली.** राजाचा मृत्यू झाल्यानंतर त्याच्या थोरल्या मुलाने गादीवर बसायची प्रथा आजवर सर्व हिंदुस्थानातच काय पण जगभर चालत आली होती. अल्तमशने त्याला छेद द्यायचं ठरवलं. अल्तमशच्या दरबारातील अमीरांनाही हे अजिबात पसंत पडलं नाही. त्यांनीही अल्तमशच्या या निर्णयाला विरोध करुन पाहिला पण त्यांचं काहीही चाललं नाही.

अल्तमश ग्वाल्हेरच्या मोहिमेवर ११ महिने बाहेर असतांना त्याच्या मुलीने म्हणजे रझिया सुलतानाने कारभार सर्वोतोपरी सुंदर सांभाळला. आपले मुलगे राज्य चालवायला नालायक आहेत हे अल्तमशला माहीत होतं म्हणून आपल्यानंतर तिनेच सिंहासनावर बसावं अशी त्याची इच्छा होती. त्याच्या मृत्यूनंतर दरबारातल्या उमरावांना आणि रझियाच्या सावत्र आईला हे बिलकुल पसंत नव्हतं. पण जनता तिच्या बाजूने होती. तेव्हा तिच्या सावत्र आईने रझियावर मारेकरी पाठवले, रझियाला हा सुगावा लागताच तिच्या पलंगावर एका दासीला झोपवण्यात आलं. आणि दुसरे दिवशी रझियाच्या खुनाची बातमी जेव्हा जनतेत पसरली आणि लोक दंगा करत राजवाड्यासमोर गोळा झाले, तेव्हा ती स्वतः चेहऱ्यावर नकाब ओढून जनतेत उभी होती. लोक दंगा करायला लागले तेव्हा ती प्रगट झाली आणि जनतेच्या आग्रहामुळे गादीवर आली. तिने स्वतःला रझिया सुलतानाच्या ऐवजी सुलतान म्हणवून घ्यायला सुरुवात केली.

तिला सतत दरबारी उमराव आणि सावत्र भावांशी लढाई करावी लागली. तिचे जे विश्वासाचे तरुण उमराव साथीदार होते, त्यात मलिक अल्तोनियो होता आणि याकुब नावाचा एक हबशीही होता. हबशी आणि रझिया, दोघांचे प्रेमसंबंध असावेत अशी दरबारी लोकांना शंका होती. याकुबला मारुन टाकल्यावर तिच्या दरबारी विरोधकांकडून तिच्या साथीदारांनाच भडकवण्यात आलं, आणि त्यातल्या मलिक अल्तोनियोने तिच्याविरुध्द शस्त्र धरलं. रझियाने त्याच्यावर हल्ला करुन त्याला कैद केलं तेव्हा त्याचे डोळे उघडले. नंतर त्यालाच घेऊन रझिया आपल्या भावाशी बेहरामशहाशी लढायला दिल्लीवर आली.

या लढाईत ती ठार झाली. पण तिच्या मृत्यूविषयी आणखी एक आख्यायिकाही आहे.

त्यात रझियाचा मृत्यूही चटका लावणारा ठरला. जवळ जवळ झांशीच्या राणीसारखाच. रझिया आपल्या सावत्र भावावर स्वारी करण्यासाठी दिल्लीत आली. लढाई जोरात असतांना ती लढत लढत दूर गेली आणि एकटी पडली. त्याचवेळी तिला भूक लागली म्हणून ती शोध घेत असतांना तिला एक फकीर दिसला. त्याने तिला रोटी दिली. पण रोटी घेत असतांना त्या फकीराला तिच्या हातातली हिऱ्याची अंगठी दिसली आणि गळ्यातली जाड सोन्याची साखळी त्याच्या नजरेस पडली. तेव्हा ही कोणीतरी मोठ्या घराण्यातली स्त्री आहे हे त्याच्या लक्षात आलं. म्हणून त्याने गुपचुप एका कोतवालला निरोप पाठवला. कोतवालने तिला पकडलं आणि सावत्र भावाच्या - बेहरामशाहच्या स्वाधीन केलं. बेहरामशहाने तिला ठार मारलं आणि दिल्लीला आणून दफन केलं.

**रझियानंतर आला तिच्याच काळात उदयाला आलेला, मूळचा गुलाम विकला गेलेला बलबन गादी बळकावून सत्तेत आला. बलबनची मुलं कमजोर निघाल्यानंतर घराणं बदललं. थोडक्यात, भारतावर गुलामांनीही राज्य केलं.**

**बलबननंतर आला जलालुद्दीन खिलजी**. बलबनच्या नातवाचा खून करून जलालुद्दीनने सत्ता बळकावली. आता गुलाम घराणं बदललं आणि खिलजींची सत्ता दिल्लीत सुरू झाली. (३ जून १२९० ते २० जुलै १२९६ ) **त्याचा पुतण्या क्रूर अल्लाउद्दीन हा विंध्य ओलांडून दक्षिणेत पाय ठेवणारा पहिला परकीय आक्रमक शत्रू.** आल्लाउद्दीनच्या विंध्य ओलांडण्याने भारतातील हिंदु राजांचा, ह्या प्रचंड मोठ्या लाटेत, मोठ्या बोटीला जलसमाधी मिळावी तसा विलय झाला. १२ व्या शतकापासून शिवाजीमहाराजांचा उदय होईपर्यंत भारतीय जनता ह्या मुसलमानी लाटेत घुसमटत राहिली.

आपल्या काकाच्या हाताखाली राजकारण शिकत असतांना अल्लाउद्दीनने दिल्लीचं तखत काबीज करायचं स्वप्न पाहिलं. आणि ते करायला लागणारा पैसा मिळवण्यासाठी इ.स.१२९३ मधे दक्षिणेच्या समृध्द राज्यांची वाट धरली. देवगिरी पाशी येऊन तो उभा राहिला. यादवांना त्याने सपशेल हरवले आणि प्रचंड लूट घेऊन तो दिल्लीला पोचला. ६०० मण सोनं, ७

मण मोती, २ मण रत्नं, १००० मण चांदी, आणि ४००० रेशमी वस्त्रं घेऊन तो गेला. ती दौलत बघायला जलालुद्दीन काकाला एकट्याला माणिकपूरला महालात बोलावलं आणि तो आल्यावर त्याच्या पाठीत खंजीर खुपसून काकाला ठार केलं आणि त्या जोरावर दिल्लीतली सत्ता जिंकली. ( १२९० ते १३१६ ) अल्लाउद्दीनला फक्त पैसा हवा होता, त्यामुळे यादवांचं राज्य ताब्यात घ्यायच्या भानगडीत तो पडला नाही. दक्षिण भारतात पाय ठेवण्याचा पायंडा मात्र त्याने सुरु केला, आणि त्यामुळे सर्व भारताला मुसलमान राजवटीची कलाटणी मिळाली.

अल्लाउद्दीनची कहाणी ही पद्मिनीच्या उल्लेखाशिवाय अधुरीच राहील. अत्यंत चित्तवर्धक कहाणी राणी पद्मिनीची आहे. चितोडचा रावळ रतनसिंग याची पद्मिनी ही अतिशय सुंदर पत्नी. असं म्हणतात की रतनसिंगने अपमानित केलेला राघव नावाचा कवी सूड घेण्याच्या विचाराने अल्लाउद्दीनकडे गेला होता आणि त्याने पद्मिनीच्या सौदर्याची खूप तारीफ सुलतानाकडे केली. तिच्या सौंदर्याची ख्याती ऐकून अल्लाउद्दीन खिलजीने चितोडवर स्वारी केली. रतनसिंगाला कैद करून आपल्या तळावर नेलं. आणि राणी पद्मिनीची मागणी केली.

तेव्हा दुसरे दिवशी चितोडच्या किल्ल्यावरून अनेक सजवलेल्या पालख्या बाहेर पडल्या आणि खिलजीच्या तळावर आल्या. खिलजी खूष झाला. त्याने पालखीचे पडदे उघडायची आज्ञा दिली तेव्हा त्यातून अनेक शस्त्रधारी सैनिक बाहेर पडले. त्यांनी रावळची सुटका केली आणि अत्यंत वेगाने ते चितोडच्या किल्ल्यात निघून गेले. संतापाने बेभान झालेल्या अल्लाउद्दीनने चितोडच्या किल्ल्याला वेढा घातला. रावळ रतनसिंग खूप चिकाटीने आणि शौर्याने लढला. पण शेवटी किल्ल्यातली रसद संपली आणि किल्ला खिलजीच्या ताब्यात द्यायची वेळ आली तेव्हा चितोडमधले सर्व पुरुष केशरी कपडे परिधान करून जिंकू किंवा मरू या निश्चयाने बाहेर पडले आणि राणी पद्मिनीसह सर्व स्त्रियांनी जोहार केला. अल्लाउद्दीनच्या हाती पडली ती फक्त स्त्रीपुरुषांच्या देहांची रक्षा. भारतीय इतिहासात, आत्मबलिदानाने आत्मसन्मानाने चितोडच्या राणी पद्मिनीने अमरपद मिळवलं.

**अल्लाउद्दीन मेल्यावर त्याच्या धाकट्या मुलाने गादी बळकावली पण त्याचा वजीर खुसरोने घात करून ठार मारलं आणि गादी बळकावली पण तो चारच महिने सत्तेत राहिला कारण गयासुद्दीन तुघलकाने वजिराचा खून केला आणि परत सत्तांतर झालं. अल्लाउद्दीनचा सेनापती मलिक काफरनेही सत्ता हाती घ्यायाचा प्रयत्न केला पण तो यशस्वी झाला नाही.**

**मग इ. स. १३२० मधे गियासुद्दीन तुघलकाने सत्ता हातात घेतली. ( १३२० ते १३२५ )– त्याच्यानंतर महंमद तुघलक** गादीवर आला. ( १३२५ ते १३५१ ).

**तुघलक घराणं संपवलं ते तैमूरने. १७ डिसेंबर १३९८ ला तैमूरने दिल्ली जिंकली. पण राज्य केलं नाही. तैमूरने नेमलेल्या गव्हर्नरचा सैयदचा पराभव करून नंतर आलं लोदी घराणं. या घराण्याचा मूळ पुरुष बहलोलखान लोदी ( १४५१ ते १४८९ ) – सिकंदरखान लोदी (१४८९ ते १५१७ ) – इब्राहिमखान लोदी ( १५१७ ते १५२६ ) यांची राजवट झाली.**

अशी एकामागोमाग घराणी बदलत राहिली. ही प्रत्येक घराणी पाच पंचवीस वर्षच सत्तेत राहिली. या घराण्यांचा अंतही वारस कमजोर होणे आणि खंजीर नाहीतर पराभव याच मार्गाने झाला.

**बाबर :-**

**अल्लाउद्दीन खिलजीच्या झंझावातानंतर परत दुसरी प्रचंड लाट भारतावर येऊन आदळली ती बाबरची. त्याच्यामुळे भारताचा इतिहासच बदलला.** बाबरच्या वडिलांचं नाव ओमर शरीफ मिर्झा आणि आई कतलघनिगार खानुम. वडिलांकडून

तैमूरच्या रक्ताचा आणि आईकडून चंगिजखानच्या रक्ताचा वारसा मिळालेल्या बाबरचा जन्म इ. स. १४ फेब्रुअरी १४८३ मधे, आताच्या उझबेकिस्तानमधे फरघाना जिल्ह्यात झाला. वयाच्या १२ व्या वर्षी बापाच्या मृत्यूनंतर त्याच्याकडे फरघाना जिल्ह्याची जहागिरी आली. इ. स. १४९७ मधे त्याने समरकंदचा कब्जा मिळवला आणि साम्राज्य उभे करण्याच्या आपल्या महत्वाकांक्षेच्या मागे तो लागला. पण भाऊबंदकीमुळे स्थिर होणं त्याच्या नशिबी नव्हतं. शेवटी काबूल जिंकून त्याने आपलं राज्य निर्माण केलं. त्याचवेळी दिल्लीच्या इब्राहिमखान लोदीच्या भावाने त्याला दिल्लीवर आक्रमण करण्याचं निमंत्रण दिलं आणि आपल्या भावाचा पराभव करायला सांगितलं. बाबराने ही संधी अजिबात दवडली नाही.

२१ एप्रिल १५२६ या दिवशी पानिपताजवळ दोघांच्यात मोठी लढाई होऊन, त्याने इब्राहिमखान लोदीला ठार करुन लढाई जिंकली. आणि नंतर आग्र्याला आला. आता त्याला काबूलला जावंस वाटेना. त्याने भारतातच राहण्याचा निर्णय घेतला आहे हे राणा संगाला कळलं. आणि बाबरलासुध्दा पूर्ण वर्चस्वासाठी त्याला मेवाडचा राणा संग यालाही जिंकणं भाग होतं. राणा संगाने सर्व मुसलमानी राजांचा पराभव केला होता हे बाबरने ऐकलं होतं. त्यामुळे आपला शत्रू मोठा आहे याची त्याला जाणीव होती. मेवाडच्या महाराणा कुंभाचा राणा संग हा नातू. अतिशय आक्रमक, पराक्रमी. **भारताचं राज्यवैभव मोंगलांकडे गेलं ते मेवाडच्या राणा संगाशी झालेल्या बाबरच्या लढाईनंतर.**

मेवाडच्या भोवती मुसलमानी अंमलाने वेढूनच टाकलं होतं. वरती उत्तरेला लोदीचं राज्य, गुजरातमधे मुझफ्फरशहा, माळव्यात खिलजी होताच. इब्राहिमखान लोदीशी झालेल्या संघर्षात राणा संगाचा एक डोळा गेला, एक पाय तुटला आणि पायाला बाणाची जखम होऊन तो पंगूही झाला. त्यामुळे त्याने राज्य करण्याचं नाकारलं तेव्हा दरबारी मंडळींनी आपल्याला असाच शूर राजा हवा आहे असं सांगून त्याला सिंहासनावर बसवलं. बाबरशी लढण्यासाठी सर्व रजपूत एक झाले. कनवा हे भरतपूरपासून १३ मैलांवर आणि आग्र्यापासून ३७ मैलांवर असलेलं गाव. १२ मार्चला बाबर कनवाला आला.

१७ मार्च १५२७ या दिवशी सकाळी लढाईला तोंड लागलं. बाबरकडे तोफा होत्या, पण राणाकडे तोफा नव्हत्या. हा शक्तीचा मोठा फरक दोघांमधे होता. त्यामुळे बाबरच्या तोफांच्या माऱ्यापुढे राणाची फौज पाचोळ्यासारखी भुईसपाट झाली. बाबरने आपल्या काही फौजेला राणाच्या पिछाडीला जाऊन हल्ला करायला सांगितलं. त्यामुळे राणाची फौज बाबरच्या चिमटीत अडकली. राणाची अश्वदळ आणि पायदळावर त्याची भिस्त होती. राणा संगाला प्राणांतिक जखम झाली आणि बाबर लढाई जिंकला. राणा संग ठार झाला आणि लढाईला मोंगलाच्या बाजूने निर्णायक वळण लागलं. बाबरचा म्हणजेच मोंगलांचा दिल्लीवरचा अंमल कायम झाला तो पुढे कित्येक शतकं. दिल्लीच्या लगत असल्यामुळे राजपुत घराण्यांचा मोंगलांशी, आपलं अस्तित्व टिकवण्यासाठी सतत संघर्ष होत राहिला.

भरतभूमीवर ह्या घराण्यातील सत्ताधीशांनी मोठीच राजकीय वादळं  घुमवत ठेवली. ह्या सर्व निर्णायक लढाया उत्तरेत झाल्या. आणि परकीय सत्ता गाजवू लागल्या. बाबर भारतात आला, दिल्ली जिंकून राज्य करायला लागला. त्याचा पुत्र हुमायूँ तो लहान असतांना आजारी पडला. मरणाच्या दाराशी उभा राहिला. बाबरने अनेक हकीम बोलावले, अनेक उपचार केले पण हुमायूँ बरा होईना. तेव्हा त्याला एका फकीराने सांगितलं की तुला जे प्राणप्रिय असेल ते दान दे म्हणजे त्याला जीवदान मिळेल. दरबारातल्या त्याच्या सल्लागारांनी त्याच्याजवळचा कोहिनूर दान करायला सांगितला पण बाबरने ते नाकारलं आणि स्वतःचा प्राणच पणाला लावला. आश्चर्य म्हणजे हुमायुँ बरा व्हायला लागला आणि बाबर खंगत खंगत २६ डिसेंबर १५३० मधे अल्लाला प्यारा झाला. .

हुमायूँ चरित्र म्हणजे रात्र आणि दिवस जसे पाठोपाठ येतात तसं भाग्य आणि दुर्भाग्याचा खेळ होता. अत्यंत चमत्कृतीपूर्ण घटना त्याच्या आयुष्यात घडल्या. देव तारी त्याला कोण मारी आणि आयुष्याची परवड म्हणजे काय या दोन गोष्टींचं तो जिवंत उदाहरण होता. बापाने दिलेल्या आत्मसमर्पणाने तो पहिल्यांदा वाचला. बाबर मेला आणि हा उठला. मिळालेलं आयुष्य सगळं चैन, आणि गुलछर्रे उडवण्यात घालवलं. अफूचंही त्याला जबरदस्त व्यसन होतं.

त्याच्या या रंगेलपणाचा फायदा शेरशहा सुरी या बिहारच्या नबाबाने घेतला. हुमायुँ आणि शेरशहात धुमश्चक्री झाली. बंगालमधे शेरशहाबरोबर झालेल्या या लढाईत हुमायुँचे सैनिक पळत सुटले, हुमायुँ वाचला पण गंगानदीत पडला. नदीतून जाणाऱ्या निजाम नावाच्या एका नाविकाने त्याला वाचवलं. तेव्हा खूष होऊन त्याने निजामला म्हटलं की मला जेव्हा दिल्लीचं तख्त मिळेल तेव्हा मी तुला अर्ध्या दिवसाचा राजा करेन. आणि हुमायुँने तसं केलंही. त्या नाविकाला अर्ध्या दिवसाचा बादशहा बनवलं. नाविकानेही त्या अर्ध्या दिवसात रग्गड जहागिऱ्या स्वतःला आणि नातेवाईकांना करुन घेतल्या.

वाचून आलेला हुमायुँ दिल्लीला येऊन रंगेलपणा करत राहिला. दुसऱ्यांदा शेरशहाने हल्ला केला तेव्हा कनोजजवळ लढाई झाली. ह्या लढाईत परत बादशहा गंगेत पडला, तेव्हा लोकांनी आपल्या पगड्या सोडून त्याचा दोर बनवला आणि त्याला वाचवलं. **त्यानंतर मात्र दिल्लीचा बादशहा बनला शेरशहा. त्याने १५४० ते ४५ अशी ५ वर्ष राज्य केलं. नंतरच्या त्याच्या वंशजानी १० वर्षे राज्य केलं. तेवढ्या १० वर्षात सहा वारस बदलले.**

आणि इकडे हुमायुँ मात्र वणवण फिरत एका राज्याकडून दुसऱ्या देशात आसरा शोधत हिंडत राहिला. आधी तो मारवाडच्या राजाकडे गेला. तिथे राहिला पण काही दिवसांमधेच, तो आपल्याला मारेल या भीतीने हुमायुँ अचानक एका अपरात्री कुटुंबाला घेऊन बाहेर पडला आणि सकाळी पाहतो तर एका वाळवंटात उभा होता. त्या वाळवंटात त्याचे आणि त्याच्या कुटुंबाचे तहानेने व्याकूळ होऊन खूप  हाल झाले. मग एकाने त्याला आपला घोडा दिल्यावर तो निघाला आणि आपल्या भावांच्या आश्रयाला गेला पण त्यांनी त्याला हाकलून लावलं. मग तो गेला अमरकोटच्या राजाकडे. तिथे आरामात रहात असतांना तिथल्या दाईच्याच प्रेमात पडला आणि इतका दिवाणा झाला की तिच्याशी त्याने लग्नच करून टाकलं. तिचं नाव होतं हमिदा बानू.

तिथे काही काळ राहिला पण तिला दिवस गेलेले असतांनाच तो तिला तिथेच ठेऊन कंधारकडे निघाला. प्रवासात फार लांब गेलेला नसतांनाच त्याला कळलं की हमिदाला मुलगा झालाय. तो खूष झाला आणि परत फिरला. या मुलाचा जन्म १४ ऑक्टोबर १५४२ ला झाला. **हाच तो इतिहासप्रसिध्द सम्राट अकबर.** हुमायूँ परत सगळ्यांना घेऊन कंधारला गेला. आणि आपल्या भावाकडे राहिला. तिथे त्याला बातमी लागली की कंधारचा आपला भाऊ आपल्याला ठार करणार आहे, तेव्हा हमिदाला घेऊन आणि अकबर बाळाला दूधदायांच्या हाती सोपवून बाहेर पडला. आणि फारसला पोचला. वाटेत त्याचे भुकेने इतके हाल झाले की त्याच्या साथीदारांनी घोड्याला मारुन त्याचे मांस आपल्या लोखंडी शिरस्त्राणात शिजवून खायला घातलं. आणि फारसला पोचवलं. थंडीने काकडणाऱ्या, हाल सोसून आलेल्या हुमायुँला फारसच्या तहमास्प राजाने १२ हजार फौज देऊन त्याला मदत केली. ती फौज घेऊन हुमायुँ निघाला आणि वाटेत अफगाणिस्तानातून आपल्या मुलाला, म्हणजे अकबरला घेऊन दिल्लीला पोचला. तोपर्यंत त्याच्या बैरामखान नावाच्या सरदाराने शेरशहाच्या वंशजांना हरवून दिल्ली जिंकली होती. हुमायुँ परत बादशहा बनला. बादशहा बनून जेमतेम वर्ष झालं झालं होतं. २७ जानेवारीच्या रात्री आकाशनिरक्षण करत गच्चीत बसला असतांना मशिदीतून बांग ऐकल्यावर नमाजाला म्हणून उठला तो तोल जाऊन जिन्यावरून खाली पडला आणि तिथेच मेला. आता मात्र त्याला वाचवायला कुणी आलं नाही. मृत्यू जिंकला होता. १७ मार्च १५०८ ते २७ जानेवारी १५५६ पर्यंत तो जगला.

हुमायूँ मेला तेव्हा बैरामखान अकबराबरोबर गुरुदासपूरजवळ कलनूर गावात होता. अकबर लहान होता. पण बैरामखानाने अकबरच्या मस्तकावर ताज ठेऊन त्याला बादशहा म्हणून घोषित केलं. या बैरामखाननेच अकबरला घडवलं. हुमायूँ मेला आणि गुरुदासपूरहून निघून दिल्लीला येऊन सिंहासन काबिज करेपर्यंत मधल्या २९ दिवसाचा राजा म्हणून हेमु नावाचा पराक्रमी पुरुष राज्यपद भोगून गेला. अकबरने त्याच्यावर स्वारी करून त्याला जिंकलं, बैरामखानने अकबरला हेमूचं मस्तक उडवायला सांगितलं पण लहान अकबरकडून ते कृत्य झालं नाही, तेव्हा बैरामखाननेच हेमूची गर्दन उडवली. अकबराची राजवट दीर्घ काळ गाजली. तेराव्या वार्षी तो गादीवर आला. आणि ४९ वर्षे राजसत्ता भोगून डायरियाने गेला.

**अत्यंत पराक्रमी, कुशल राजकारणी म्हणून अकबराने इतिहास लिहिला**. १४ ऑक्टोबर १५४२ मधे याचा ज्न्म उमरकोटला झाला. अब्दुल-फत्तेह- जलालुद्दीन –महंमद-अकबर हे त्याचं नाव संपूर्ण नाव. याची पत्नी हीरकुँवर ही जयपूरच्या राजा भारमलची कन्या. हिच्याच पोटी जहाँगीर जन्मला. मारियम-उजह् झमानी या नावाने ती ओळखली जाते. ही पट्टराणी ८० वर्षे जगली आणि राजकारणातला फार मोठा काळ हिने अनुभवला. मलिका-ऐ- हिंद या किताबाने तिचा मोठा सन्मान केला गेला. आग्र्याचा संत सलीम चिश्तीच्या कृपेने हिला मुलगा झाला. अकबराला आणखीही बऱ्याच राण्या होत्या.

अकबर सम्राट हे अनेक दृष्टीने अलौकिक, अतुलनीय, बहुआयामी व्यक्तिमत्व होऊन गेलं. राष्ट्र निर्मितीसाठी आणि देशात शांतता नांदावी म्हणून हिंदू-मुस्लीम ऐक्याचा त्याने केलेला पुरस्कार उल्लेखनीयच आहे. संपूर्ण निरक्षर असला तरी हा धर्मशास्त्रसंपन्न राजा होता. अकबराला निद्रानाशाची व्याधी होती. त्यामुळे रोज तात्री तो मौलवींबरोबर धर्म, त्यातील तत्वे, त्याचा विस्तार यावर चर्चा करत असे. याचा अनेक धर्माचा व्यासंग मोठा असल्याने अकबराने इबादतखाना नावाचा महाल बांधला. त्यात अनेक धर्मपंडित, विचारवंत, एकत्र येऊन अनेक धर्मावर वादविवाद घडवून आणत. धर्मपंडितांच्या या वैचारिक मंथनातून, या त्या चर्चांवर विचार करुन अकबराने आपल्या आणि इतर धर्मांवर आधारित असा एक नवीन धर्म स्थापन केला. त्याचं नाव होतं दिन-ऐ-इलाही. पण कर्मठ रुढीवादी पंडितांना अकबराचं हे धाडस पसंत पडलं नाही. कुमकुम तिलक लावून सूर्यपूजा करणं ही त्याची श्रध्दा होती. शिया आणि सुन्नींच्या भांडणांवर त्याने बंदी आणली होती. त्याच्या ग्रंथालयात संस्कृत-पर्शियन-काश्मिरी- ग्रीक-लॅटीन अशी २४ हजार अभ्यसनीय पुस्तकं होती. त्यांच्या देखरेखीसाठी त्याने जाणकार विद्वान, पुस्तकं नकलणारे, लेखक, हस्ताक्षरतज्ञ बाळगले होते. तो दिवाळीसण मोठ्या उत्साहात साजरा करत असे. गंगेचं पाणी मागवून तेच प्यायचा. बाटलेल्या हिंदू लोकांना त्यांच्या धर्मात परत जाण्याची त्याने दिलदार मनाने परवानगी दिली होती..

उत्तम शिकारी म्हणून याचा लौकिक होता. त्याच्यासमोर पडलेल्या हरणाच्या कातडीवरून ते हरीण कोणत्या जंगलातलं आहे ते त्याला ओळखता येत असे. तो उत्तम प्राणी शिक्षक होता. अनेक चित्यांना शिकवून तयार केलं होतं, नव्हे, त्याचा तो छंद होता.

आपल्या कारकीर्दीला सुरुवात केल्याबरोबर अकबर राज्यविस्ताराला लागला. हिंदू स्त्रियांशी विवाह करुन त्याने देशात शांतता नांदवण्याचा एक मार्ग स्वीकारला. शिवाय अनेक संस्थानिकांपुढे मैत्रीचा हात पुढे केला. फक्त राणा संगाच्या घराण्याने मोंगल सम्राटांशी सतत संघर्षाचाच पवित्रा घेतला. आधी राणा संगाने बाबराशी लढा दिला, मग त्याचा पुत्र उदयसिंग दिल्ली तखताला विरोध करत राहिला. राणा प्रताप तर आयुष्यभर अकबराशी लढत राहिला. हलदीघाटाच्या लढाईत राणा प्रतापाचा पराभव झाला. तेव्हा त्या विजयाने खूष होऊन अकबराने सिक्री गावाजवळ फत्तेपूर सिक्री हे शहर वसवलं. सिक्रिच्या चिश्तीचा तो भक्त होता. फत्तेपूरला त्याने आपली राजधानी आणली.

पण पुढे उत्तरेतील सिंधु खोऱ्यातील मोहिमांच्या वेळी ती लाहोरला हलवली. आणि मग परत आग्र्यालाच आणली. फत्तेहपूरला पाण्याचा पुरवठा कमी होता, म्हणून ती राजधानी त्याला बदलावी लागली.

सत्तेत आल्याबरोबर सम्राट अकबराने माळवा जिंकलं. पाठोपाठ गोंडवन, बिहार, काश्मीर, राजपुताना, गुजराथ, उत्तरेत काबूल, लडाख, सिंध, बलुचिस्तान, कंदाहार ( गांधार ) एकएक देश तो जिंकतच गेला. अहंमदनगरला मुलाला पाठवून त्याने ते जिंकलं, तेव्हा स्वतः अहंमदनगरच्या बाहेर तळ टाकून बसला होता. काबूल ते अहंमदनगर आणि पश्चिमेकडून क्वेट्टा ते बंगालपर्यंत याच्या राज्याचा विस्तार पसरला. गुजरातच्या विजयानंतर त्याने विजयाचं स्मारक म्हणून बुलंद दरवाजा बांधला. तो आजही अत्युत्कृष्ट स्थापत्यकलेची साक्ष देत उभा आहे.

अकबराने पंडितांचा, कलाकारांचा प्रज्ञावंतांचा मोठा सन्मान केला. त्याच्या दरबारातील नवरत्नांचा खजिना म्हणजे बिरबल, तानसेन, अब्दुल रहिमखान, तोडरमल, राजा मानसिंग, फैजी, मुल्ला दो पियाजा, अबुल फजल इब्न मुबारक, फकिर आझियोउद्दीन ही नररत्ने होती.

अकबरनामा आणि ऐने अकबरी ह्या त्याच्या चरित्रावरून तो एक उत्तम कलाकार, सुतारकाम, लोहारकामातला निपुण, चित्रकार, सेनानी, लढवय्या, धर्मशास्त्रपंडीत, विज्ञानप्रेमी, आणि प्राणी शिक्षक होता हे कळतं. अनेक चित्यांना बाळगून त्याने त्यांना शिक्षण दिलं होतं. प्रभावी, अतुलनीय सम्राट तर होताच. इ.स. १६०५ मधे अकबर मृत्यू पावला.

त्यानंतर आला जहाँगीर. म्हणजेच नूर-उद्दीन-महंमद सलीम. गादीवर आल्यावर त्याने जहाँगीर हे नाव धारण केलं. याने अनेक लग्ने केली. त्यात एक होती, अंबरच्या भगवानदासची राजकन्या मनभावतीबाई. हिचा पुत्र म्हणजे राजपुत्र खुसरो. दुसरी होती मनमतीबाई हिच्या पोटी जन्मला खुर्रम्. म्हणजेच शहाजहाँ. तिसरी बिकानेरची राजकन्या. त्याने अनेक लग्नं केली, पण नूरजहाँ या बेगमने इतिहास गाजवला. शेर अफगाण या अकबराच्या सरदाराची ही पत्नी. तो मेल्यावर त्याच्या मेहरुन्नीसा या विधवेशी जहाँगीरने लग्न केलं. या बाईने दरबारात खूप राजकारण केलं. मोठ्या वकुबाची ही बेगम होती. आयुष्याच्या अंतिम टप्प्यात जहाँगीर सर्वस्वी तिच्यावर अवलंबून राहू लागला.

जहाँगीरला खुसरो, पर्वीज, खुर्रम्, शहरयार असे पुत्र झाले. अकबराच्या उतरत्या काळात दक्षिणेतील निजामशाही-आदिलशाही ही राज्ये परत स्वतंत्र झाली होती. त्यांना परत आपल्या सत्तेखाली आणण्याचं काम जहाँगीरला करावं लागलं. याने मुघल आणि पर्शियन कलेला खूप प्रोत्साहन दिलं. मुघल चित्रशैली याच्या काळात बहरली. काश्मीरचं शालिमार उद्यान ही त्याच्याच रसिकतेची पावती. अकबराचीच हिंदू-मुस्लीम ऐक्याची धर्म आणि राजकारणाची धोरणं याने स्वीकारली आणि पुढे नेली. त्यामुळे याच्याही काळात देशात शांतता नांदली. धार्मिक लढाया, नरसंहार घडले नाहीत.

**त्यानंतर आला शहाजहाँ. तिसऱ्या क्रमांकावर जन्मूनही हा गादीवर आला ही कलाटणीच होती.** याची आई रजपूत होती. तिचं नाव मन्मत होतं. पण मुसलमान नाव ताजबिबी बिल्कीस मकानी. अल् आझाद अबुल मुझ्झफर शाहाबुद्दीन महंमद म्हणजेच शहाजहाँ. अकबरने आपल्या लाडक्या नातवाचं नाव खुर्रम ठेवलं, आणि जहांगीरने त्याला शहाजहाँ हा किताब देऊन त्याचं नाव शहाजहाँ केलं. हा वाढला मात्र सम्राट अकबरच्या बेगमजवळ म्हणजे आपल्या आजीजवळ. याचा जन्म लाहोरला ५ जानेवारी १५९२ मधे झाला. अकबराचा १६०५ मधे मृत्यू झाल्यावर जहांगीर सिंहासनावर आला. मोंगलांची सिंहासनारोहणाची पध्दत अशी होती की विधीपूर्वक, मृत राजाच्या चेहऱ्यावर पाय ठेवून मोंगल युवराज सिंहासनावर बसत असे.

सावत्र आईमुळे, म्हणजेच नूरजहामुळे शहाजहाँला गादी मिळवायला बराच प्रयास पडला. सुरवातीचा त्याचा काळ महाराष्ट्रात गेला. निजामशाहीचा सरदार मलिक अंबर याने मोगल सत्ता धुडकावून लावत आपलं बस्तान परत बसवलं तेव्हा त्याच्याशी लढण्यासाठी शहाजहाँ दक्षिणेत आला. नूरजहाँला त्याला गादीच्या हक्कावरून दूर करायला कट कारस्थानं करावी लागली. त्याकाळात शहाजहाँ अज्ञात वासात जुन्नरला रहात होता.

मुळात शहाजहाँ भावांमधे तिसरा जन्मला होता. सर्वात मोठा भाऊ खुसरो याचा खून झाला. त्यानंतर पर्वीज होता. त्यातच नूरजहाँने आपल्या मुलीचं लग्न शहरयार या जहांगीरच्या चौथ्या मुलाशी लग्न लावलं होतं. त्यामुळे नूरजहाँला शहरयारलाच बादशहा बनवायचं होतं. शहाजहाँला सिंहासन मिळण्याची शक्यता फार दूर होती. पण शहरयार आणि पर्वीज मृत्यू पावले आणि शहाजहाँ गादीवर आला. गादीवर आल्यावर मात्र त्याच्या पराक्रमाने राज्याच्या सीमांचा विस्तार झाला. शहाजहाँ आणि शहाजी हे दोन समकालीन पराक्रमी आणि जबरदस्त मुत्सद्दी राजकारणी महाराष्ट्रात भातवडीच्या लढाईत एकमेकांसमोर उभे ठाकले आणि त्यानंतर या दोघांच्याही वंशजांचा संग्राम पुढे चालूच राहिला. औरंगजेबाचा सामना शिवरायांशी घडला. आणि शिवरायांच्या नातवांचे संग्राम औरंगजेबाच्या पुढच्या वारसांशी घडले.

शहाजहाँ हा स्थापत्यकलेचा मोठा प्रेमी होता. आग्र्यातील जामा मशिद, मोती मशिद, ताजमहाल, दिल्लीचा लाल किल्ला, ही त्याच्या कलासक्त निर्मितीची ठळक उदाहरणं. दिल्लीचा लाल किल्ला हा त्याकाळचे प्रसिध्द उस्ताद हमिद आणि उस्ताद हिरा यांनी बांधला. शहाजहाँने त्यासाठी तालकटोरा ही जागा निश्चित केली होती, पण या दोघां वास्तुपंडितांनी खारी जमीन म्हणून त्या ऐवजी सलीमगढजवळची जागा शोधून निश्चित केली. पाया खणल्यावर काही काळ ती जागा मोकळी सोडून सर्व हवामानाला तोंड देईल अशी जमीन तयार झाल्यावर, धौलपूरचे दगड आणून ९ वर्षात हा किल्ला तयार केला. ( आणि पुढच्या काळात सिमेंटचा शोध लागल्यावर ब्रिटीशांनी त्याच तालकटोरा भागात पाया खणून त्यात सिमेंट ओतून राष्ट्रपती भवन बांधलं. ). शहाजहाँ इतका उच्च कोटीचा कलासक्त होता की या किल्ल्यासाठी ३०० मैलांवरून, सरहिंदमधून कालव्याने पाणी आणले. याचं मुख्य कारण म्हणजे या जागेजवळ यमुना उंचीवरून वहात नाही. तिचे पाणी खेळवणं शक्य नव्हतं. किल्ल्यात आणलेल्या पाण्यात त्याने रंगबिरंगी मासे सोडले. एक माणिक आणि दोन छोटे मोती बांधलेली नाजूक साखळी त्या माशांच्या डोक्याला बांधलेली असे.

दुर्मिळ मौल्यवान रत्नांच्या संग्रहाचा त्याला मोठा शौक होता. त्याच्या खजिन्यात अशी अनेक मौल्यवान रत्ने होती. आणि त्यामुळे तो जगप्रसिध्द होता. इतरही त्याला अनेक छंद होते.

मुमताजमहल ही त्याची अत्यंत आवडती बेगम हिला चौदा मुलं झाली. शहाजहाँचा सर्वात मोठा मुलगा दारा शुको, हा विद्वान सर्वधर्मांचा अभ्यासक अतिशय देखणा आणि बापाचा अत्यंत आवडता होता. दुसरा मुलगा शाहशुजा, हा शूर, विवेकी आणि दृढनिश्चयी होता. तिसरा औरंगजेब आणि चौथा मुरादबक्ष. याची कुवत सर्व दृष्टीने कमीच होती. पण शेवटी सिंहासनारुढ झाला तो औरंगजेब.

औरंगजेबाने आपल्या बापाला मारण्याचा खूप प्रयत्न केला. एकदा एका हकीमाबरोबर विषही पाठवलं. पण त्या हकीमाने बादशहाच्या प्रेमाखातर, स्वतः ते पिऊन आपली जीवनयात्रा संपवली. शहाजहाँ म्हातारा झाला पण त्याची स्त्रैण आणि विलासी वृत्ती कमी झाली नव्हती. एकदा तो आरशात पाहून स्वतःच्या मिशांना पीळ देत असतांना पाहून त्याच्या दोन दासी एकमेकींकडे पाहून हसल्या. आपल्याला त्या म्हातारा समजतात ही गोष्ट शहाजहाँला मनाला खूप लागली म्हणून त्याने कामुकवृत्ती वाढवण्याची औषधं घ्यायला सुरुवात केली. त्या औषधांमुळे त्याचं मूत्राशय बिघडलं, लघवी बंद पडली आणि त्यात

तो आग्र्याच्या किल्ल्यात २२ जानेवारी १६६६ मधे कालवश झाला. त्याचं प्रेत गुपचुपपणे ताजमहालात नेऊन पुरण्यात आलं आणि मगच औरंगजेबाला त्याच्या निधनाची वार्ता कळवण्यात आली. **मुघल सल्तनतला परत नवीन कलाटणी मिळाली आणि तिसऱ्या क्रमांकावर जन्मलेला औरंगजेब आलम्गीर झाला.**

**औरंगजेब**. मुखमे राम-बगलमे छुरी याचं सदेह उदाहरण म्हणजे औरंगजेब. अब्दुल मुझफ्फर मुईउद्दीन महंमद औरंगजेब हे त्याचं पूर्ण नाव. १४ ऑक्टोबर १६१४ मधे याचा जन्म गुजरातमधे दाहोदला झाला. अत्यंत कपटी, संन्यस्त वृत्तीने राहण्याचं सोंग करणारा, जाहीरपणे भिक्षा मागणारा, हातात सतत स्मरणी घेऊन हिंडणारा, स्वतः विणलेल्या गवताच्या चटयांवर झोपणारा, आणि स्वतःच्या विणलेल्या टोप्या विकून त्यावर आपण भाजीपाला आणून गुजराण करतो असं सांगत हिंडणारा हा धूर्त युवराज होता मात्र अत्यंत धीट आणि शूर. इस्लाम धर्मावर त्याची नितांत श्रध्दा होती.

आपल्या मुलांचं एकमेकांशी असलेलं खुनशी नातं शहाजहाँ पूर्णपणे ओळखून होता. म्हणून त्याने त्याच्या लाडक्या दाराला आपल्याजवळ ठेवलं, औरंगजेबाला औरंगाबादला सुभेदार पाठवलं आणि शाहशुजाला बंगाल प्रांत सांभाळायला दिला होता. मुरादबक्षला गुजरात सांभाळायला दिला.

**साल १६५७**. शहाजहाँच्या मुलांमधे यादवी घडलेलं साल. या साली शहाजहाँ खूप आजारी पडला. त्याच्या मृत्यूबद्दल अफवा उठू लागल्या. तेव्हा चारी मुलगे सत्तेसाठी भांडायला लागले. दाराने विषप्रयोगाने बापाला मारलंय ही अफवा उठली आणि शाहशुजा बंगालहून सिंहासन मिळवायला निघाला. कपटी औरंगजेबाने मुरादबक्षला कळवलं, की मी सत्तेसाठी लोभी नाही. मला मक्केला जाऊन राहायचंय, तूच पुढचा बादशहा आहेस, पण आता दाराने बापाला मारलंय, म्हणून त्याचा पराभव करणं जरुरीचं आहे. तू आणि मी एक होऊन त्याच्यावर हल्ला करू. मुरादबक्षने त्याच्यावर विश्वास ठेवला. औरंगजेब आणि मुराद एक होऊन त्यांची आणि दारा शुकोमधे लढाई झाली. त्यात दाराचा पराभव होऊन तो लाहोरला पळून गेला. दारावर विजय मिळाल्यावर औरंगजेब आणि मुरादबक्ष आग्र्याला पोचले. शहाजहाँला औरंगजेबाने कैद केलं. आग्रा ताब्यात घेतलं आपला मामा शाहिस्ताखानाला त्यावर कारभारासाठी नेमलं आणि मग मुरादबक्ष आणि औरंगजेब दिल्लीला निघाले.

मथुरेजवळ यमुनेच्या काठावर कोलाकी कोठी या जागी औरंगजेबाचा तळ पडला. आणि परत औरंगजेबाने कपटी चाल खेळली. या ठिकाणी मुरादबक्षला त्याने कपटाने कैद केलं. दारानंतर तुझाच गादीचा हक्क आहे, मी तुला माझ्या हाताने मुकुट घालीन, म्हणून तू माझ्याकडे ये. आपण मोठा उत्सव करू असं सांगून त्याने मुरादला आपल्या तळावर बोलावलं. मुरादला त्याच्या सर्व सल्लागारांनी असं न करण्याची कळकळीने विनंती केली पण होणे न चुके. त्यामुळे मुराद औरंगजेबाच्या तळावर गेला. औरंगजेबाने त्याच्या सगळ्या अधिकाऱ्यांना भरपूर खायला प्यायला घातलं. सैन्याला लांब ठेवलं. अधिकारी झोपायला पांगल्यावर आणि मुराद मदिरेत धुंद झाल्यावर, त्याला आपल्याजवळच्या महालात झोपायला पाठवलं. मुरादचा भरवशाचा अधिकारी –शहाबाज हा मुरादजवळ उभा होता, त्याला औरंगजेबाने बाहेर बोलावलं. शहाबाज बाहेर आल्याबरोबर दाराआड लपलेल्या माणसांनी त्याचा खून केला. मग मुरादला कैद केलं तेव्हा मुराद जागा झाला आणि भानावर आला. औरंगजेबाने मध्यरात्री एका हत्तीवरून दिल्लीला पाठवलं आणि सलीमगढच्या किल्ल्यात कैद करून ठेवलं. रात्रभरात झालेल्या या कपटनाट्याचा मुरादच्या सैन्याला आणि अधिकाऱ्यांना पत्ताच लागला नाही. कळलं तेव्हा सकाळ झाली होती. आणि मुराद दयनीय अवस्थेत कैदी होऊन दिल्लीत पोचला होता. पुढे औरंगजेबाने त्याच्यावर एका न झालेल्या मनुष्यवधाचा खटला चालवून, आपण फार न्यायी आहोत हे दाखवण्यासाठी, मुरादचा शिरच्छेद केला. पुढे दारा आणि शाहशुजाही लढायांमधे संपले.

**शहाजहाँच्या एका आजारी पडण्याने एवढा इतिहास बदलला. औरंगजेब आलमगीर झाला.**

अशा औरंगजेब नावाच्या कपटी माणसाला शिवरायांनी फसवलं आणि आपली आग्र्याहून सुटका करुन घेतली यातच शिवरायांच्या धाडसाची, उत्तम आखणी करण्याच्या चतुराईची कल्पना येते.

औरंगजेबाचा मृत्यू नगरला इ. स. १७०७ च्या २० फेब्रुवारीला झाला. इ. स. १६८२ मधे शिवरायाच्या स्वर्गवासानंतर याने प्रचंड फौजेसह महाराष्ट्रात पाय ठेवला आणि सगळा महाराष्ट्र ३० वर्षे ढवळून टाकला. २३ वर्षाचा संभाजीराजा नाहीसा करुन स्वराज्याचा भाग त्याच्या साम्राज्याला जोडण्याचं स्वप्न पहात तो ३० वर्षे महाराष्ट्रात लढत राहिला आणि शेवटी  नगरला ८९ व्या वर्षी निधन पावला.

**अठरावं शतक वेगळंच राजकारण घेऊन उजाडलं. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर सबंध भारताच्या राजकारणाला एक मोठंच वळण लागलं. या शतकात भोसले-मुघल घराणी नाममात्र झाली. दक्षिणेतही हैदर अली नावाचा नवीनच तारा उगवला. इ.स. १७१३ मधे महाराष्ट्रात पेशवाईचा उदय झाला आणि दिल्ली सल्तनतही कमजोर इ. स. १७१२ मधे औरंगजेबाच्या पुत्राचा म्हणजे बहादूरशहाचा मृत्यू झाल्यावर सय्यद बंधूंच्या हातात गेली. सय्यदांच्या अस्तानंतर म्हणजे इ.स. १७२० मधे वजीर प्रबळ झाले. बहादूरशहानंतर त्याचा मुलगा जहंदरशहा, पाठोपाठ वर्षाभरात फर्रुकसायर यांचं गादीवर येणं आणि खूनात पर्यवसन होणं घडलं. त्यानंतर आलेला बहादूरशहाचा नातू महंमदशहा मात्र बराच काळ टिकला. महंमदशहा १७४८ मधे मेला. हे साल दिल्ली सल्तनतीला खूप वेगळी दिशा देऊन गेलं. दक्षिणेत प्रबळ असलेला निजाम याच साली वारला. आणि कर्तबगार, पराक्रमी, मुत्सद्दी लोकांची कमी जाणवू लागली. त्याआधीच्या काळात नादिरशहाने दिल्ली धुवून, लुटून नेली. त्याचा खून त्याच साली झाला आणि अहंमदशहा अब्दाली हे नवीन पात्र राजकारणाच्या मंचावर उगवलं. त्याने भारतावर ३ वेळा स्वारी करून भारताचं राजकारण घुसळून काढलं. त्याचवेळी नजीबखान नावाचा एक खलनायक पुढे आला, त्यातून घडलं पानिपत. एकेकाळी बलिष्ठ असलेल्या मोंगलांचे दिवस फिरले आणि इ. स. १७५२ मधे मराठे वरचढ होऊन त्यांचे संरक्षक बनले. मराठ्यांच्या पराक्रमाचा दबदबा भारतभर निर्माण झाला.**

**याच काळात दुसरीकडे हळूहळू इंग्रजांचा प्रभाव वाढायला लागला. इ. स. १७५७ सालच्या प्लासीच्या लढाईत,  २२ ऑक्टोबर १७६४ मधे झालेल्या बक्सरच्या लढाईत आणि १७६३ मधे फ्रेंचांशी पाँडेचारीत झालेल्या युध्दाच्या विजयाने इंग्रजांचा भारतातील राजकारणातला प्रभाव आणि शिरकाव निश्चित झाला.**

मोंगलांच्या घराण्यातला शेवटचा बहादूरशहा जफर हा शेवटचा वंशज इंग्रजांच्या हातून पकडला जाऊन रंगूनमधे कैदेत खितपत पडला आणि तेथेच त्याने देह ठेवला. १८५७ च्या भारतीय स्वातंत्र्ययुध्दाच्या वेळी मीरतमधून बंड करून बाहेर पडलेल्या सैनिकांनी दिल्ली गाठली. म्हातारा बहादूरशहा लाल किल्ल्यात होता. त्याच्या नावाने बादशहा म्हणून पुकारा केला आणि सैनिक निघून गेले. दिल्लीची ही बंडाळी अंबाल्याच्या इंग्रजांना तारेने कळवली गेली. त्यांनी लगेच सैन्याची जमवाजमवी करून दिल्लीला फौज पाठवली. त्यात बहादूरशहाला जानेवारीत कैद करून इंग्रजांनी १७५८ च्या मे महिन्यात बहादूरशहाला रंगूनच्या तुरुंगात पाठवलं.

'' दो गज जमींन भी न मिली कुएं यारमे '' या वेदनेत, दिल्लीत मरण येईल हे स्वप्न उराशी बाळगत, आपण आपल्या पूर्वजांच्या कबरी शेजारीच दफन केले जाऊ या आशेने शेवटी बहादूरशहा रंगूनलाच ७ नोव्हेंबर १८६२ मधे निधन पावला. रंगूनमधे कैदेत असतांना बहादूरशहा जफर आपल्या दु:खावर शायऱ्या लिहित, दर्दभरे उसासे टाकत राहिला. ' न किसीकी आँखका नूर हूँ, न किसीके दिलका करार हूँ ..लगता नहीं हैं दिल मेरा .. म्हणत राहिला. काही वर्षांनी इ. स. १९०८ मधे शिक्षा भोगण्यासाठी मंडालेत येऊन राहिले आणि त्यांनी  ''गीतारहस्य '' जन्माला घातलं. दोघांच्या मनोबलात किती हा फरक.

**राजपुताना :-**

भारताच्या इतिहासात पराक्रम, शौर्य आणि मोंगलांशी झगडा यात रजपूतांचं नाव फार मोठं आहे. दिल्लीशी या राज्याच्या सीमा भिडलेल्या असल्याने यांचा सतत आपल्या अस्तित्त्वासाठी संघर्ष करावा लागला. यांचा इतिहास फार प्राचीन काळापासून आहे.

राजपुतान्यात महत्वाची राज्ये ३ होती. १. उदेपूर २. जयपूर ३. जोधपूर.

उदेपूरच्या राणा यांनी मोंगलांशी सतत संघर्ष करून आपला स्वतंत्र बाणा कायम राखला. आणि आपला सन्मानही राखला. अमरसिंग, संग्रामसिंह सारखे मोठे पराक्रमी राजे या कुळात झाले. जोधपूरचे जसवंतसिंह, अजयसिंह, अभयसिंह, असेच पराक्रमी होते. जयपूरचा जयसिंह हा तर मोंगलांच्या दरबारातला मोठाच सरदार. याचा शिवाजीमहाराजांच्या काळात वरचेवर महाराजांशी संपर्क झाला. त्याचा मुलगा रामसिंह, शिवरायांच्या आग्र्याच्या कैदेच्यावेळी मोठ्या जोखमीत अडकला होता. शिवरायांची जबाबदारी त्याच्याचवर होती. राजपुतान्यातील या घराण्यांशी पुढे पेशवाईच्या काळात होळकर, शिंद्याशीही यांचा संघर्ष होत राहिला.

चितोड आणि सिसोदे ही दोन्ही एकाच वंशाची दोन राज्ये. मेवाडच्या राजांना राणा म्हणत, आणि चितोडचे राजे रावळ. अल्लाउद्दीन खिलजीनेही या दोन्ही राजांवर हल्ला केला होता. राजपूत राजांपैकी अनेकांनी अकबराशी सलोख्याचे संबंध जोडले होते. कुणी आपल्या मुली दिल्या, तर कुणी मांडलिकत्व स्वीकारलं. एक राणा प्रताप होता ज्याने अकबराकडून आलेला स्नेहाचा प्रस्ताव ठुकरावला. त्याची जबरदस्त किंमत राण्याला द्यावी लागलीच. राणा प्रतापबरोबर झालेल्या हळदी घाटाच्या लढाईने इतिहासात मानाचं पान मिळवलं. राणा प्रतापचा चेतक घोडाही या लढाईत आपल्या मालकाशी दाखवलेल्या इमानामुळे इतिहासप्रसिध्द झाला. दिल्ली फार जवळ असल्यामुळे या रजपूत राजांचा कायमच मोंगलांशी संघर्ष होत राहिला.

**महाराष्ट्र :-**

**महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी निर्माण झालेल्या घराण्याचे मूळ पुरुष म्हणजे सिसोद्याचे सजनसिंग आणि क्षेमसिंग. त्यांच्या वंशात जन्मले शुभकृष्ण आणि करणसिंग. करणसिंगांची शाखा घोरपडे नावाने ओळखली जाते आणि शुभकृष्णाची शाखा भोसले या नावाने ओळखली जाते. शुभकृष्णाच्या वंशात जन्मले मालोजी ( जन्म इ. स. १५५२ ) आणि विठोजी बंधू. मालोजीचा मुलगा शहाजी ( जन्म इ. स. १८-३-१५९५ ) आणि शरीफजी. शरीफजी तरूण लहान वयात लढाईत मारला गेला. शहाजीचे पुत्र- जिजाबाईच्या पोटी संभाजी ( जन्म इ. स. १६१९ ) आणि पुत्र शिवाजी ( जन्म इ. स. १९-२-१६३० ) जन्मले,आणि शहाजीची दुसरी पत्नी तुकाबाई हिचा पुत्र एकोजी ( जन्म इ. स. १६२९ ) झाला.. शिवाजीराजांचे पुत्र सईबाईच्या पोटी संभाजी ( जन्म १४ मे १६५७ ) आणि सोयराबाईचा राजाराम ( जन्म २४ फेब्रुअरी १६७० ) जन्मले. शिवाजीला आणखी ६ मुली होत्या. संभाजीचा पुत्र शाहू येसूबाईच्या पोटी ( जन्म १८ मे १६८२ ) जन्मला. आणि राजारामाचे पुत्र ताराराणीच्या पोटी शिवाजी (दुसरा – जन्म ९ जून १६९६ ) आणि राजसबाईच्या पोटी संभाजी (दुसरा – जन्म २३ मे १६९८ ). दुसरा शाहू हा सातारा गादीचा मालक इ. स. १७०७ मधे गादीवर आला. आणि दुसरा संभाजी हा इ. स. १७१४ मधे ताराराणीला बाजूला करुन कोल्हापूरच्या गादीचा मालक झाला.**

**या दोघांनाही पुत्र झाले नाहीत, त्यामुळे भोसले घराण्याच्या औरस पुत्रांची परंपरा खंडीत होऊन दत्तक पुत्रांची वंशावळ सुरू झाली. ही आहे भोसले कुळाची वंश परंपरा.**

भारताच्या दक्षिणेतल्या अर्ध्या भागात पाच शाह्या आल्या आणि आजवर विस्कळीत असलेल्या मराठी शूरांना त्यांच्या दरबारात पराक्रम गाजवायची संधी मिळत गेली. सिसोद्याहून दक्षिणेत आलेल्या कर्णसिंग आणि शुभकृष्ण हे दोन भावांनी घृष्णेश्वरजवळ वास्तव्य केलं..त्याकाळात दौलताबादजवळचा परिसर गजबजलेला होता. तिथे हे दोघेही कधी शेती तर कधी लष्करी चाकरी अशा उद्योगात रमले. कर्णसिंग बहामनीच्या हाताखाली फौजेत लढत असतांना त्याने घोरपड लावून खेळणा किल्ला सर केला. बहामनीने त्याला किताब दिला - राजे घोरपडे बहाद्दर. आणि मुधोळजवळचा ८४ गावांचा भाग इनाम दिला. हेच ते घोरपडे. कर्णसिंग मुधोळला जाऊन स्थिरावला. शुभकृष्ण वेरूळजवळच्या भागाचा मालक झाला. ते भोसले घराणं. या शुभकृष्णाच्या वंशात दोन मुलगे झाले मालोजी आणि विठोजी. मालोजीचे मुलगे शहाजी आणि शरीफजी. मालोजीला निजामशाहीतून पंचहजारी मनसब, चाकण आणि शिवनेर हे दोन किल्ले आणि पुणे, सुपे हे दोन परगणे जागीर म्हणून मिळाले. या दोन परगण्याचं एका राष्ट्रात रुपांतर केलं ते या वंशात जन्मलेल्या शिवरायांनी. शहाजीराजांच्या काळात स्वराज्य कल्पनेचा उदय झाला आणि शिवरायांच्या अलौकिक सूर्यपराक्रमाने महाराष्ट्राच्या भूमीवरचे परकीयांचे काळे ढग विरुन गेले. या मातीने मोकळा श्वास घेतला. या भूमीपुत्रांनी उगवत्या सूर्याला आपल्या ओंजळीने मुक्त मनाने अर्ध्य वाहिलं. ‘ उदंड जाहले पाणी स्नानसंध्या करावया.. ‘ अशी मन:स्थिती रयतेची झाली.

मनात महत्वाकांक्षा, विचारात आक्रमकता आणि स्वभावाने उद्योगी असलेल्या शहाजीराजांनी, प्रचंड कर्तृत्व असलेल्या या वीराने निजामाच्या दरबारात मोठं स्थान मिळवलं. शहाजीराजांनी कधी आदिलशाही, कधी निजामशाही, कधी मोगल यांच्या चाकरीत राहून मोठं राजकारण केलं. निजामशहाच्या लहान मुलाला गादीवर बसवून पेमगिरीला परत निजामशाही स्थापण्याचं राजकारणही त्यांनी प्रत्यक्षात उतरवलं. शहाजहाँची २ लाख फौज छातीवर घेऊन तिला टक्कर देण्याचं धाडस दाखवलं. पण शेवटी ते राज्य नामशेष झाल्यावर आदिलशहाशी झालेल्या लढाईत पराभव झाल्यामुळे आदिलशाहीतच त्यांनी शेवटपर्यंत चाकरी केली. बंगलोर, कोलार, बाळापूर हे त्यांचे परगणे होते पण त्याचं वास्तव्य बंगलोरलाच असे. या दोन शाह्यांशी सतत जुळवून घेत राहिल्यामुळे परकीयांच्या चाकरीत राहण्यापेक्षा स्वतंत्र हिंदू राज्य हवं या विचारांचा ध्यास घेतला. आणि ते स्वप्न प्रत्यक्षात उतरवलं. बंगलोर हे त्यांना मिळालेल्या जहागिरीतच त्यांनी वास्तव्य केलं. आणि त्यांच्यानंतर त्यांची दुसरी पत्नी तुकाबाई हिच्यापासून झालेल्या व्यंकोजीराजांनी तंजावर ही आपली कर्मभूमी केली. शहाजीराजांच्यानंतर एकोजींनी तंजावर झिंकलं आणि आपली संस्कृती, साहित्य, कला यांचा परामर्ष घेतला. शहाजीराजांचा शेवट लढाईत न होता, शिमोग्याजवळच्या होदेगिरीच्या जंगलात शिकारीला गेलेले असतांना घोडा वेलीच्या जाळ्यात अडकला आणि राजे घोड्यावरून खाली पडले आणि त्यात २३ जानेवारी १६६४ मधे त्यांचा अंत झाला.

शहाजीराजे विजापूर दरबारी रुजू झाले. तेव्हा १२ हजार फौजेची सरदारी आणि सरंजामास मुलुख पुणे देश शहाजीराजांना विजापूरच्या आदिलशहाने दिला. शहाजीराजांनी कान्होजी जेधे यांना आपल्याकडे मागून घेतलं आणि दादोजी कोंडदेव मलठणकर यांना, आपल्या पुत्राच्या मदतीसाठी पुण्याच्या देखभालीसाठी पाठवलं.

**शिवाजी**...एक राष्ट्र निर्माण करण्याचा वकुब असलेला महापराक्रमी, रयतेच्या लोभातला राजा, चाकण आणि शिवनेरी हे दोन किल्ले आणि सुपे आणि पुणे हे दोन परगणे एवढीच जागिर वडिलांकडून मिळालेल्या शिवरायांनी एक सुखी,

संपन्न, राष्ट्र आपल्या अथक पराक्रमातून निर्माण केलं. अचाट अद्‌भूत कृत्ये करणारा, अफाट पराक्रम, अचाट कर्तृत्व आणि धाडसी स्वभावाचा राजा म्हणजेच शिवाजीराजा. शिवरायांनी मोंगलांवर दरारा निर्माण केला. त्यांच्या ३५ वर्षांच्या कारकीर्दीत औरंगजेब स्वराज्यात पाय टाकू शकला नाही. त्याची तेवढी हिंमतच नव्हती. वयाच्या पंधराव्या वर्षी आपल्या जीवाला जीव देणाऱ्या शूर मावळ्यांच्याबरोबर शिवरायांनी स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवली. अफझलखान-शाहिस्ताखान, सुरतची लूट, आणि आग्र्याहून सुटका एवढ्या घटनांनी त्याला महाराजांचा वकूब माहीत झाला होता. इ. स. १६७४ मधे राज्याभिषेक झाल्यावर दक्षिणेचं राजकारण करून तीन वर्षांनी शिवाजी महाराज परत आले. आणि त्यानंतर त्यांचा आजारपणात ३ एप्रिल १६८० मधे रायगडावर मृत्यू झाला. शिवरायांचं स्फूर्तीदायक चरित्र महाराष्ट्रातला प्रत्येक जाणतो.

शिवरायांच्या राण्या सईबाई ( निंबाळकर ), हिचा पुत्र संभाजी. दुसरी राणी सोयराबाई ( शिर्के ) हिच्या पोटी जन्मला राजाराम. सगुणाबाई ( ( शिर्के ), पुतळाबाई ( मोहिते ), लक्ष्मीबाई ( विचारे ), सकवारबाई ( गायकवाड ), काशीबाई ( जाधव ), गुणवंताबाई ( इंगळे ). राजांना दोन मुलगे आणि सहा मुली झाल्या.

पण महाराजांच्या कैलासवासानंतर महाराष्ट्राच्या राजकारणाला वेगळं वळण लागलं नाही. परंपरेप्रमाणे त्यांचे ज्येष्ठ पुत्र संभाजीराजे गादीवर आले. संभाजीराजांना आपला हक्क झगडून मिळवावा लागला. दरबारातलं आणि घरातलं राजकारण त्यांच्या विरूध्द असल्यामुळे संभाजीराजांना आपला हक्क बळजबरीने मिळवावा लागला. तेव्हा ते अवघे २३ वर्षांचे होते. त्यांची राणी येसुबाई..आणि पुत्र शाहू. संभाजीराजे गादीवर आले आणि महाराष्ट्राच्या राजकारणाच्या प्रवाहाला वेगळं वळण मिळालं. महाराजांच्या दरबारातल्या जुन्या मंत्रिमंडळाच्या विरोधात संभाजीराजांनी आपला कारभारातला जम आपल्या निवडक लोकांच्या मदतीने बसवला. ९ वर्षे मोंगल, पोर्तुगीजांबरोबर लढून राज्यकारभार केला. अफगाणिस्तानापासून विजापूरपर्यंत विस्तरलेल्या बादशहाच्या साम्राज्याला स्वराज्याचा एक तुकडा जोडून अखंड भारताचं स्वप्न पाहणारा औरंगजेब, स्वराज्य आपल्या साम्राज्याला जोडण्यासाठी आसुसला होता. त्याच्या दृष्टीने हा पोरसवदा मुलगा म्हणजे किस झाडकी पत्ती होता. २२ मार्च १६८२ ला प्रचंड सैन्य घेऊन औरंगजेब दख्खन भूमीवर उतरला. मोठं राजकारण घुमायला लागलं. औरंगजेबाविरुध्द राजांची तलवार कायम म्यानाबाहेरच राहिली. शेवटी नियतीच औरंगजेबाच्या बाजूला गेली आणि तिच्या मदतीने आजवर संभाजीराजांच्या मागावर लावलेले गुप्तहेर राजांचा माग शोधण्यात यशस्वी झाले.

संभाजीराजांच्या पतनाचे ढग इ. स. १६८७ सालापासूनच जमू लागले होते. राजे बहुतेकवेळा पन्हाळगडावर असत म्हणून बादशहाने त्या बाजूला आपल्या फौजा पाठवल्या. सर्व डोंगरवाटा बंद केल्या. सर्व नाक्यांवर पहारा ठेवला. बादशहाला मिळालेले शिर्के वगैरे सरदार कोकणात बंडावा करायला पाठवले गेले. तेव्हा कलुशा खेळण्यावर गेला. राजे त्याच्या मदतीसाठी खेळण्यावर गेले. राजांच्या फौजेतल्या फितुरीमुळे राजांच्या हालचाली बादशहाला कळायला लागल्या. संभाजीराजांना त्याची कुणकुण लागली. राजे कलुशाला घेऊन रायगडाला यायला निघाले. वाटेत संगमेश्वराला अलकनंदा आणि वरूणा नद्यांच्या संगमावर असलेल्या नावडी गावातल्या त्यांच्या वाड्यात दोघे मुक्काला थांबले. . . .

महाराष्ट्राचा वाघ राजा नियतीच्या पिंजऱ्यात जेरबंद होण्यासाठी पुढे पुढे सरकत होता. म्हणूनच गाफील राहिला.

संभाजीमहाराज संगमेश्वरी त्यांच्या वाड्यात राहायला येणार असल्याची वार्ता गुप्तहेरांनी आणल्यावर औरंगजेबाचा सरदार शेख निजाम उर्फ मुकर्रबखान कोल्हापूरहून २ हजार स्वार आणि एक हजार पायदळ घेऊन संगमेश्वरी पोचला. कलुशा मोगली फौजेवर धावून गेला, पण त्याच्या हाताला जखम झाल्यामुळे तो परत फिरला तेव्हा संभाजीराजांना खबर लागताच ते

त्या वाड्याच्या तळघरात शिरून अंधारात लपून बसले. पण शेख निजामाने तळघरात प्रवेश करून राजांना कैद केलं. आणि हत्तीवर दोघांना घालून दोरीने बांधलं. १ फेब्रुवारी १६८९, मार्गशीर्ष व. ७ ला संभाजीराजे पकडले गेले. तेव्हापासून सव्वा महिना ११ मार्च पर्यंत राजांनी मृत्यूशी जी वीरोचित, असामान्य झुंज दिली त्याला तोड नाही. औरंगजेबाच्या क्रूर आणि अमानुष वृत्तीला तडाखेबंद उत्तर दिलं. आणि धैर्याचं असामान्य उदाहरण प्रजेसमोर ठेवलं. ११ मार्च १६८९ ला संभाजीराजांचा राजांचा औरंगजेबाच्या छावणीत करुण अंत झाला.

शेखनिजामाने औरंगजेबाला आपला मोठा विजय कळवला. औरंगजेब तेव्हा अकलूज गावात होता. तो तातडीने बहादूरगडावर आला. त्याच्या छावणीबाहेर ४ मैलांवर असतांना बादशहाने निरोप पाठवून कलुषासह राजांना चित्रविचित्र पोशाखात, डोक्यावर खुळखुळे लावलेली विदुषकी टोपी घालून उंटावरून छावणीतून फिरवत आणायला सांगितलं. राजांचा उंट मधून मधून जोरात पळवला जाई. त्यावर बांधून बसवलेल्या राजांना त्याचा मनस्वी त्रास होत होता.

बादशहासमोर आणल्यावर त्यांना त्याच्यासमोर उभं करण्यात आलं, बादशहाने दोघांजवळ जाऊन त्यांना न्याहाळलं. आणि तो परत गेला. दोघांना कैदेत टाकण्यात आलं. पण धैर्यशील धडाडीपूर्ण राजांनी त्याच्यासमोर मान झुकवली नाही. त्यामुळे बादशहा संतापला. त्यानंतर राजांना कसं मारायचं यावर बादशहाने सल्लागारांशी खल केला, आणि रहुल्लाखान सरदाराला पाठवून राजांना खजिना आणि जडजवाहिराची ठिकाणं विचारली पण ती सांगण्यास राजांनी ठाम नकार दिला. कोणत्या मोगल सरदारांनी राजांशी संधान बांधलं होतं तेही सांगण्यास राजांनी नकार दिला, तेव्हा बादशहाने सर्व माहिती दिली आणि मुसलमान धर्म स्वीकारला तर जीवदान देण्याची तयारी दाखवली. राजांनी रहुल्लाखान सरदाराला बाणेदार उत्तर देऊन सांगितलं की तुझ्या बादशहाला सांगा की, '' मृत्यू आणि हालअपेष्टांना भिऊन हा शिवाजीचा पुत्र जिवाची बिलकुल पर्वा करीत नाही. तुमचा तो दुष्ट धर्म स्वीकारून कायमची अधोगती संपादणे मला इष्ट वाटत नसलं तरी बादशहा आपली मुलगी मला देऊन जावई करून घेत असेल तर मी त्याच्या सूचनेचा विचार करीन. असं करण्यातच बादशहाचं कल्याण आहे. ' औरंगजेब या उत्तराने पिसाळल्यासारखा चिडला. या दोन्ही दुष्टांच्या जीभा कापण्यात याव्यात असा त्याने हुकूम सोडला. मग त्यांचे डोळे काढले गेले. दृष्टीहीन, रक्तबंबाळ अवस्थेतच राजांना परत कैदेत टाकलं. तो दिवस संपला. त्यानंतरचे १५ दिवस राजांचे अनन्वित छळ करण्यात आला. पुढच्या पंधरा दिवसात बादशहाने आपला मुक्काम हलवून कोरेगावाला नेला.

कोरेगावाला गेल्यावर राजांचा एकेक अवयव तोडत ते अवयव कुत्र्यांना खायला घालत शेवटी त्यांचा शिरच्छेद करण्यात आला आणि मस्तक पेंढा भरून छावणीत फिरवून आणण्यात आलं. शेवटी ते मस्तक फेकून देण्यात आलं. राजांचं शरीर फोडून त्यातून हृदय काढण्यात आलं आणि शरीर उकिरड्यावर फेकून दिलं. राजांची हीच शिक्षा कलुशालाही मिळत होती. दोघांचा करूण, हृदयद्रावक अंत झाला. आपल्या राजांचे हताशपणे पहात बसलेल्या मराठ्यांनी नंतर त्या दोघांची मस्तकं आणून भीमा- इंद्रायणी संगमावर तुळापूरला त्यावर अग्नीसंस्कार केले. शरीर हाती लागलंच नव्हतं.

राजांचा असा अंत झाल्याची बातमी रायगडावर असलेल्या येसूबाई, शाहूराजे आणि रामराजे यांना मिळाली. संभाजीराजांच्या पत्नी येसूबाई आणि पुत्र बालराजे शाहू दोघेही औरंगजेबाचे कैदी बनले आणि त्याच्या छावणीत पाठवले गेले. राजारामांना घाईघाईने राज्याभिषेक करून गुप्त मार्गाने पन्हाळगडावर नेण्यात आलं आणि त्यांचा जीव वाचवला गेला. राजाराम पन्हाळ्याला गेले हे कळल्यावर औरंगजेबाच्या फौजा तिथे वळल्या. तेव्हा ३०० निवडक विश्वासू साथीदारांसह राजे गुप्त वेषात, कधी बैरागी, कधी व्यापारी, कधी भिकारी बनत, वेषांतर करत, धर्मशाळा-देवालयं-रानात मुक्काम करत जिंजीला पोचले. शिवाजीमहाराजांनी त्यांच्या हयातीत तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला होता, त्याचा फायदा राजारामांना झाला. त्यांचा जनानखाना विशाळगडावर कडक बंदोबस्तात ठेवण्यात आला. आणि राजारामराजे जिंजीला सुखरुप पोचल्यावर त्यांच्या

ताराबाई आणि राजसबाई या राण्यांना जिंजीला नेण्यात आलं. त्यानंतरची ८ वर्षे म्हणजे १६९८ पर्यंत राजे तिथेच राहिले. राजारामांनी तिथूनच कारभार केला.

**इथे भोसले घराण्याच्या राजकारणाचा पहिला प्रवाह बदलला. परंपरेप्रमाणे थोरल्या पुत्राचा थोरला पुत्र शाहू गादीवर यायला पाहिजे, ते न होता परिस्थितीला सामोरं जाण्यासाठी राजाराम हा महाराजांचा दुसरा पुत्र गादीवर आला. आणि** राजकारणाबरोबर राजधानीनेही रूप बदललं. **रायगडावरची राजधानी आता सातारला हलली.**

राजारामराजे गादीवर आले तेव्हाच एक नवा अंकुर या स्वराज्यवृक्षाला फुटत होता. राजारामराजे जिंजीला जाऊन राहिले आणि त्यांचे प्रतिनिधी म्हणून, अमात्य म्हणून कारभार करणाऱ्या कर्तृत्ववान पुरुषांकडे राज्याची सूत्रं गेली. हे सर्व महाराजांच्या काळापासून त्यांच्या सेवेत असलेल्या आपल्या घरातल्या पुरुषांकडून कारभाराचे संस्कार घेतले होते. राजकारण जवळून पाहिलं होतं. त्यांनी आपल्या चातुर्यावर आणि शौर्यावर राज्य अबाधित ठेवलं. त्यामुळे राजे जिंजीला राहिले तरी वयोवृध्द औरंगजेबाच्या हाती स्वराज्याची सत्ता आलीच नाही. स्वराज्य शत्रूच्या ताब्यात गेलं नाही. रामचंद्रपंत अमात्य, परशुराम त्रिंबक, शंकराजी नारायण, धनाजी जाधव. संताजी घोरपडे, खंडो बल्लाळ, अशा चतुर. पराक्रमी, राष्ट्रचालकांनी एकजुटीने राज्याचा गाडा सांभाळला. पण मोठा फरक झाला तो राज्य चालवण्याच्या पध्दतीत. शिवाजीराजांच्या काळातली कोणालाही वतन इनाम देण्याची राज्यपध्दत आता काळाची गरज म्हणून बदलावी लागली. आपापल्या वतनाचा सांभाळ करण्याचं काम त्या त्या वतनदारांनी केलं आणि एक प्रकारे स्वराज्याचाच सांभाळ केला.

१६८९ मधे जिंजीला जाऊन राहिलेले राजे १६९८ च्या फेब्रुअरीमधे विशाळगडावर आले. तिथून सिंहगडावर पोचले आणि इ. स. १७०० सालच्या ३ मार्चला सिंहगडावर आजारपणात स्वर्गवासी झाले. त्यांच्यानंतर त्यांची राणी ताराबाई यांच्या हाती सत्ता एकवटली. त्यांनी पुढची ७ वर्षं सहकाऱ्यांबरोबर मोठ्या शौर्याने बादशहाशी लढा दिला. त्यामुळे सत्ता त्याच शाखेकडे राहिली. ताराबाईंना पुत्र होता शिवाजी आणि राजांची दुसरी राणी राजसबाई यांना एक पुत्र होता, तो संभाजी.

**महाराष्ट्र जिंकायला म्हणून इ. स. १६८२ मधे आलेला औरंगजेब इ.स. १७०७ च्या फेब्रुवारीमधे नगरला मृत्यू झाला आणि स्वराज्यावर असणारं शत्रूचं भूत उतरलं. स्वराज्याच्या भूमीने स्वतंत्रतेचा निश्वास टाकला. पण राजकारणाला एक नवीन कलाटणी मिळाली. ताराबाईंना गादी न मिळता परत संभाजीपुत्र शाहूराजांच्या हाती सत्ता आली.**

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर दिल्लीचं तख्त ताब्यात घेण्यासाठी स्वराज्य सोडतांना मराठ्यांनी आपल्यामागे न यावं म्हणून मोगलांनी खेळलेली खेळी लागू पडली. १७०७ साली संभाजीपुत्राला कैदेतून मुक्त करत त्यालाच गादीचा वारस म्हणून घोषित करून मोंगल निघून गेले आणि ताराराणी आणि शाहू सत्तेसाठी लढत बसले. २५व्या वर्षापर्यंत सतत औरंगजेबाच्या कैदेत राहिलेल्या शाहूराजांची मुक्तता हे स्वप्न वाटावं इतकं आश्चर्यकारक होतं. कारण त्या कुटील, दुष्ट बादशहाने शाहूराजांना ना धर्मांतर करायला लावलं, ना मृत्यूदंड दिला. उलट त्यांचं लग्न लावून दिलं. औरंगजेबाने एकदा मात्र शाहूराजांना मुसलमान करण्याचा घाट घातला तेव्हा भयभीत झालेल्या येसूराणींनी झिनतुन्नीसा बेगमेजवळ करुणा भाकली आणि शाहूराजांच्या ऐवजी दोन पुरुषांना बाटवण्याच्या बदल्यात शाहूराजांची सुटका झाली. प्रतापराव गुजरांचे दोन मुलगे खंडेराव आणि जगज्जीवनराव हे दोन मुलगे बाटवले गेले. आणि महाराष्ट्रावर जी कुऱ्हाड कोसळणार होती ती वाचली. ही सुध्दा श्रींचीच इच्छा असावी.

अशा लष्करी शिक्षणात अननुभवी असलेल्या शाहूराजांकडे महाराष्ट्रात पाय ठेवतांना ना पैसा होता, ना फौज, ना माणसं. अशावेळी त्यांच्या मागे कणखरपणे उभे राहिले ते बाळाजी विश्वनाथ. आपल्या मुत्सद्दीपणाने बाळाजीपंतांनी ताराराणींच्या

पक्षातून वळवून अनेकांना शाहूराजांच्या पक्षात आणलं. शाहू महाराष्ट्रात आल्यावर ताराराणींनी आपल्या सत्ता आणि सैन्यबळावर शाहूराजांशी लढण्याचा निर्णय घेतला.

खेड शिवापूरजवळ, इ. स. १७०७ च्या धनत्रयोदशीच्या दिवशी ताराराणी आणि शाहूराजांच्या फौजा एकमेकींना भिडल्या, त्यात ताराराणीचा पराभव होऊन त्यांनी पन्हाळ्याला आपला मुक्काम हलवला आणि सत्ता शाहूराजांच्या हाती एकवटली. यावेळी बाळाजीपंतांचा मुत्सद्दीपणा कामाला आला. त्यांनी धनाजी जाधवांना शाहूच्या पक्षात आणलं, त्यामुळे लढाईच्या दिवशी धनाजींच्या फौजा लढायला आल्या नाहीत. ताराराणी कोल्हापूरला गेल्या आणि कारभार पाहू लागल्या एकाच देशात दोन सत्ताधारी झाल्यावर रयतेची जी गत होते, पंचाईत होते ती शाहूराजांनी पुढे इ.स. १७३५ मधे राज्याची वाटणी करून थांबवली. कोल्हापूरच्या गादीवर राजारामांचे पुत्र, राजसबाईच्या पोटी जन्मलेल्या संभाजी राजांची स्थापना झाली.

**जानेवारी १७०८ मधे शाहूराजांनी राज्याभिषेक करुन घेतला. स्वराज्यातल्या राजकारणाला नवीन कलाटणी मिळाली.** शाहूराजे गादीवर आले तरी राजकारणाने नवीन वळण घेतलं आणि भोसल्यांची गादी त्यांच्याच वंशजाकडे असली तरी **सत्तेचं केंद्र मात्र बदललं. ते पेशव्यांकडे गेलं.** पेशवेपदी कोणाला नेमायचं ते मात्र शाहूराजेच ठरवत. माणसाची उत्तम पारख हे शाहूराजांचं कौशल्य होतं. म्हणूनच बाळाजी विश्वनाथांच्या अंतकालानंतर त्यांचेच चिरंजीव बाजीरावांची पेशवेपदावर शाहूराजांनी नेमणूक केली. आणि पेशवाईच्या कालाचा प्रारंभ झाला. शिवरायांचे दोन पुत्र संभाजी आणि राजाराम. संभाजीमहाराजांचे पुत्र सातारचे शाहू महाराज आणि राजाराममहाराजांचे पुत्र दुसरे संभाजीराजे, दोघेही निपुत्रिक असल्यामुळे, यांच्या कैलासवासानंतर भोसले घराण्याची सत्ता औरस वारस न राहिल्यामुळे दत्तक वारसांच्या हाती गेली आणि हे तेजस्वी देदीप्यमान घराणं संधीकालासारखं मंदावलं.

**आणि त्याचवेळी पेशवाईच्या कालाचा पाया घालणारे बाळाजी विश्वनाथ भट ( पेशवेपद १३ नोव्हेंबर १७१३ ), त्यांच्यानंतर त्यांचे पुत्र, अलौकिक पराक्रमाने इतिहासप्रसिध्द झालेले थोरले बाजीराव ( जन्म- इ. स. १८ ऑगस्ट १७०० पेशवेपद १७ एप्रिल १७२० ), बाजीरावांचे पुत्र नानासाहेब पेशवे ( जन्म १२ डिसेंबर १७२१, पेशवेपद २५ जून १७४० ), नानासाहेबांचे पुत्र थोरले माधवराव पेशवे ( जन्म १५ फेब्रुअरी १७४५ पेशवेपद २० जुलै १७६१ ) यांनी स्वराज्याची सूत्रं आपल्या हाती ठेऊन कारभार केला. माधवरांच्या नंतर त्यांचे बंधू नारायणराव पेशवे झाले ( पेशवेपद १३ डिसेंबर १७७२ ) त्यानंतर सवाई माधवराव जन्मानंतर ( जन्म १८ एप्रिल १७७४, पेशवेपद मे १७७४ ) चाळीस दिवसांनी पेशवे म्हणू घोषित केले गेले, पण कारभार केला तो सुरुवातीला नाना फडणीस आणि सखारामबापू बोकीलांनी. पण नंतर सवाई माधवरावांच्या नावाने एकट्या नाना फडणीसांनी. कुलाला मोठं करायला जसा कुलदीपक लागतो, तसंच कुलाच्या अंतालासुध्दा जो दीपक लागतो तो भटांच्या घराण्यात दुसऱ्या बाजीरावाच्या रुपाने अवतरला ( पेशवेपद ५ डिसेंबर १७९६ ) आणि पेशवाई संपवायला कारण ठरला.**

अशा रीतीने शिवरायांच्या घराण्याचा काल, इ. स. १६४५ सालापासून म्हणजे महाराजांनी तलवार हाती घेतल्यापासून त्यांचे औरस वंशज संपेपर्यंत १७६० पर्यंत ठरला. शाहूराजे डिसेंबर १७५० मधे आणि कोल्हापूर गादीचे दुसरे संभाजीराजे १७६० मधे स्वर्गवासी झाले. त्यानंतर दत्तक वारसांची गादीवर स्थापना झाली.

शाहूराजांच्या निर्वाणानंतर ताराराणी जिवंत होत्या. त्यांनी परत राजकारण केलंच. तीही राजकारण्यांची एक चटकदार कहाणीच आहे. शाहूराजे जिवंत असतांनाच त्यांनी वारस शोधण्यास सुरुवात केली होती. हे कानावर येताच ताराराणींनी शाहूराजास सांगितलं की, त्यांचा नातू त्यांनी गुप्तपणे पानगावास सुरक्षित ठेवला आहे. घरातच वारस असतांना

बाहेरचा वारस शोधण्याची काय गरज ? हा शिवाजीचा मुलगा होता. त्यावर शाहूराजे विचार करू लागले. पण शाहूराजांची थोरली राणी सकवारबाई यांनी कांगावा सुरू केला आणि हा वारस खोटा असल्याचा आरोप केला. सत्ता आपल्या हातात घेण्यासाठी ताराराणींचा हा बनाव आहे असं त्यांचं स्पष्ट मत होतं. म्हणजे एकेकाळी जेव्हा शाहूराजे मोंगलांच्या ताब्यातून सुटून स्वराज्यात यायला लागले तेव्हा ताराराणींनी शाहू तोतया असल्याचा कांगावा केला, तोच कांगावा आता सकवारबाईंनी चालवला. **पण शाहूराजे जिवंत असतांना हे घडून आलं नाही. मग नानासाहेब पेशव्यांनी तो मुलगा पानगावाहून आणवला आणि त्यांचं राज्यारोहण करवलं.**

रामराजे लहान होते. त्यांनी गादीवर आल्यावर पेशव्यांच्या सल्ल्याने कारभार चालवला. पण ते ताराराणींना सहन झालं नाही. आपल्या हातातला सत्तेचा हुकमी एक्का पेशव्यांच्या हाती जातो आहे हे पाहिल्यावर ताराणींनीच रामराजांना अटक करुन किल्ल्यात ठेवलं. आणि पुढे एका देवळात नानासाहेब पेशव्यांशी भेट झाली असतांना ' हा वारस अस्सल बीजाचा नव्हे हे पेशव्यांसमोर कबूल केलं. त्यानंतर जे वारस झाले ते नाममात्रच होते.

इ. स. १८१८ मधे शनिवारवाड्यावर इंग्रजांचं निशाण फडकलं. तेव्हा गादीवर असलेल्या प्रतापसिंग राजांना सातारला अनेक करारात बांधून इंग्रजांनी त्यांना नाममात्र राजेपद दिलं. पण पुढे इंग्रजांची राज्यलोभाची तहान इतकी वाढली की त्यांनी अनेक आरोप प्रतापसिंगावर ठेवून त्यांना एकच पर्याय दिला. आरोप मान्य करा, माफीनामा लिहून द्या किंवा सत्ता सोडा. तेव्हा प्रतापसिंगराजांनी सत्ता सोडण्याचा निर्णय घेतला कारण त्यांच्यावर झालेले आरोप तद्दन खोटे होते. मग इंग्रजांनी त्यांना पदच्युत करुन काशीस नेऊन ठेवलं, आणि त्यांच्या बंधूंना गादीवर बसवलं. पण तेही खोटंच होतं. लवकरच त्यांनाही गादीवरून काढून सातारा गादी संपवून टाकली. प्रतापसिंगांनी आपले विश्वासू रंगो बापूजी गुप्ते यांना इंग्लंडास पाठवून आपली कैफियत इंग्लंडच्या सरकारसमोर मांडण्याचा खूप प्रयत्न केला १४ वर्षे इंग्लंडमधे राहून रंगो बापूजींनी अथक प्रयत्न केले पण त्यांना यश आलं नाही. **तोपर्यंत प्रतापसिंगराजांचाही काशीत मृत्यू होऊन भोसले घराणं सत्तेतून नाहीसं झालं. इंग्रजांच्या हाती सातारा गादी कायमचीच गेली.**

पेशवाईचा काल १७१३ मधे बाळाजी विश्वनाथ पेशवे झाल्यापासून, इंग्रजांनी दुसऱ्या बाजीरावांना सत्ताभ्रष्ट करेपर्यंत म्हणजे १८१८ पर्यंत टिकला. या एवढ्या कालात अनेक ऐतिहासिक घराणी उदयाला आली. त्यात होते दाभाडे, शिंदे, होळकर, पवार, आंग्रे, नागपूरचे भोसले...नाना फडणीसांचे भानू घराणे.. मराठी रियासतीचा शेवट होतांना या सत्ताप्रमुखाचा शेवटही वेगवेगळ्या प्रकाराने झाला. त्याचा इतिहासच आता पहायचा आहे.

### पेशवे घराणे :-

श्रीवर्धनच्या देशमुख घराण्यातले बाळाजी विश्वनाथ भट. यांनी जंजिऱ्याच्या सिद्दीपासून जीव वाचवण्यासाठी स्वराज्यात पाऊल ठेवलं. देशावर येतांना त्यांच्याबरोबर त्यांचे नातेवाईक वेळासचे भानू बंधूही होते. पालीचे सावकार जोशी, सासवडचे पुरंदरे यांच्या मदतीने त्यांनी उत्कर्ष साधला. अगदी खालच्या पायरीवरून सरकारी चाकरीमधे चढत चढत बाळाजी विश्वनाथांनी कमाविसदार, सुभेदार, सरसुभेदार अशा मोठ्या हुद्यापर्यंत आपला उत्कर्ष साधला आणि दौलताबादेचे सरसुभेदार म्हणून नियुक्ती होईपर्यंत त्यांचा लौकिकही वाढला. धनाजी जाधवांच्या मर्जीतले झाले. आणि तेव्हाच येसूबाई आणि शाहूराजे औरंगजेबाच्या कैदेत गेल्यामुळे त्यांची काळजी घेण्याची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. स्वराज्याचे कारभारी रामचंद्रपंत अमात्य, परशुरामपंत प्रतिनीधी, वगैरे मुत्सद्यांच्या नजरेत बाळाजीपंतांची हुशारी भरत होती. त्यामुळे बाळाजीपंतांचा राजकारणातही शिरकाव झाला आणि शाहूराजे महाराष्ट्रात आल्यावर त्यांच्या मुत्सद्देगिरीला वाव मिळाला. शाहूंची मर्जी

त्यांच्यावर बसली. शाहूंचा राज्याभिषेक झाल्यावर त्यांच्या मंत्रीमंडळात बाळाजींना सेनाकर्ते हे पद मिळालं. त्यानंतर जे ताराराणींच्या पक्षात होते त्यांना आपल्या पक्षात आणण्याचं समेटाचं काम बाळाजीपंतांनी समर्थपणे निभावलं. एकेक सरदार पक्षात आणतांना कान्होजी आंग्रे जे समर्थपणे स्वराज्याचा पश्चिम किनारा इंग्रज आणि सिद्दी यांच्यापासून राखत होते, त्यांच्यावर शाहूने बहिरोपंत पिंगळे या आपल्या पेशव्यांना पाठवलं. कान्होजींना ही बातमी लागताच ते धावून लोहगडावर आले आणि त्यांनी पिंगळ्यांना कैद केलं. आपल्याला सातारच्या गादीशी, काही देणंघेणं नाही, हेच त्यांनी दाखवून दिलं.

या कठीण प्रसंगात बाळाजीपंत हे एकटेच कान्होजींच्या तावडीतून पेशव्यांची सुटका करू शकतील असा सल्ला शाहूला मिळाला. तेव्हा बाळाजीपंतांची नेमणूक त्या कामावर करण्यात आली. पण बाळाजीपंतांनी दोन मुद्दे उपस्थित केले. ते म्हणजे कान्होजींना वठणीवर आणायला मोठ्या अधिकारावरचा माणूस त्यांच्यासमोर जायला पाहिजे आणि बहिरोपंतांचं पेशवेपद गेलेलं असून आपल्या ताब्यात असलेल्या पिंगळ्यांना आता दरबारात काहीच किंमत नाही असं कान्होजींना दाखवलं पाहिजे, त्यासाठी मला पेशवेपद द्याल तर ते दोन्ही मुद्दे लागू पडतील. परत शाहूराजांनी आपल्या सल्लागारांशी विचार करून बाळाजीपंतांना पेशवेपद दिलं आणि कान्होजींवर लोहगड काबीज करायला पाठवलं.

**त्याचा लाभ म्हणजे मांजरी इथे १७ नोव्हेंबर १७१३ मधे बाळाजींना पेशवेपदाची वस्त्रं मिळाली, पेशवेपद मिळालं आणि पेशवाईचा कालाचा पाया रचला गेला.** बाळाजीपंतांचं आणखी दुसरं मोठं कार्य म्हणजे पेशवेपद मिळाल्यावर त्यांनी दिल्लीला जाऊन शाहूराजांच्या मातोश्री येसूबाई, संभाजीराजांचे दासीपुत्र मदनसिंग आणि त्यांची पत्नी यांना स्वराज्यात आणलं आणि दुसरं म्हणजे चौथाईच्या सनदाही ते घेऊन आले. त्यांच्याबरोबर जाऊन बाजीरावांनी पहिल्यांदा दिल्ली पाहिली. बाळाजी विश्वनाथ पेशव्यांचा २ एप्रिल १७२० मधे, त्यांचा वयाच्या साठीत असतांना सासवडला कैलासवास झाला.

त्यांच्या जागी १७ एप्रिलला , १५ दिवसांनी बाजीरावांची स्थापना पेशवेपदी झाली. त्यांच्या कर्तृत्वाचा बहर इतिहास निर्माण करून गेला. आपल्या बंधूंबरोबर, चिमाजीआपांबरोबर त्यांनी सर्व लढाया गाजवल्या. छत्रसाल बुंदेलाच्या सहाय्याला जाऊन बाजीरांनी त्यांची सुटका केली. त्यामुळे छत्रसालाने बाजीरावांना आपला तिसरा पुत्र मानून त्यांना आपल्या दौलतीतला तिसरा वाटा दिला. पन्नातील हिऱ्यांच्या खाणीही बाजीरावांना या वाटणीतून मिळाल्या. आणि त्याचवेळी भेट दिली मस्तान ही लावण्यसुंदर, हुशार, नर्तिका. बाजीरावांचा विवाह सावकार जोशींच्या कन्येशी, काशीबाईशी झाला होता, पण बाजीराव-मस्तानी प्रेम प्रकरण इतिहासात गाजलं. दिल्लीहून आलेल्या निजामाबरोबर बाजीरावांच्या कायम लढाया झाल्या आणि निजामाला कायमच शरण यावं लागलं. वसईचा किल्ला जिंकून मराठी प्रजेला पोर्तुगीजांच्या जुलमातून बाजीरावांच्याच्या बंधूंनी चिमाजी आपांनी मोठं कार्य केलं. बाजीरावांच्या काळात होळकर-शिंदे-पवार, अशी अनेक ऐतिहासिक घराणी निर्माण झाली. आपल्या आयुष्यात एकही लढाई न हरणाऱ्या बाजीरावांचा २८ एप्रिल १७४० रोजी, ४०व्या वर्षी रावेरला विषमज्वराने कैलासवास झाला. पाठोपाठ डिसेंबरमधे चिमाजीआपा दुखण्यानेच गेले. मृत्यूच्या समयी बाजीराव ४० वर्षाचे आणि चिमाजीआपा अवघे पस्तीशीच्या जवळपास होते. २० व्या वर्षी पेशवेपदी विराजमान होऊन २० वर्ष, अखंड लढायांमधे तलवार गाजवून राऊ म्हणजे बाजीराव गेले.

परंपरेप्रमाणे आणि शाहूराजांच्या मर्जीखातर, बाजीरावांचे पुत्र, बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांना पेशवेपद मिळालं. १७४० मधे गादीवर आलेले नानासाहेब पानिपतच्या लढाईतल्या पराभवाने मानसिक ताणामुळे सन १७६१ च्या २३ जूनला स्वर्गवासी झाले. त्या लढाईत मराठ्यांच्या सत्तेला जशी हादरली, तसंच पेशव्यांच्या घराण्याला फार मोठं प्राणहानीचं दु:ख भोगावं लागलं. पेशव्यांच्या घराण्यातले दोन पुरुष धारातीर्थी पडले. एक पेशव्यांचा ज्येष्ठ पुत्र विश्वासराव आणि चुलत भाऊ म्हणजे चिमाजी आपांचा पुत्र सदाशिवभाऊ. ह्या सगळ्यांचेच मृत्यू हृदयद्रावक, चटका लावून जाणारे होते.

पेशवे घराण्यातल्या मृत्यूंचा योगायोग असा की दरवेळी भट घराण्यातले दोन दोन भाऊ पाठोपाठ स्वर्गवासी झाले. बाजीराऊ एप्रिल २८ ला कैलासवासी झाले तर पाठोपाठ चिमाजीआपा डिसेंबरमधे निधन पावले. पानिपतावर जानेवारीत विश्वासराव गोळी लागून पडले आणि समशेरबहाद्दर – बाजी-मस्तानीचे पुत्र जखमी होऊन वारले. पाठोपाठ सदाशीवभाऊ रणांगणावर वीरगतीला गेले आणि या पानिपत पराभवाने जूनमधे नानासाहेब पेशवेही स्वर्गवासी झाले. नानासाहेब पेशव्याच्या अमदानीत रास्ते, मेहेंदळे, नाना फडणीस, सखारामबापू बोकील अशी मातब्बर घराणी उदयाला आली.

नानासाहेब पेशवे मृत्यूसमयी ४० वर्षाचे, त्यांचे पुत्र विश्वासराव अवघे २० वर्षाचे आणि सदाशिवभाऊ तिशीतले होते. पानिपतावर अवघं मराठी सैन्य अहंमदशहा अब्दालीबरोबर लढण्यास गोळा झालं. दिल्लीच्या बादशहाच्या याचनेवरून मदतीला हे मराठे गेले होते. सेनापती होते सदाशिवभाऊ आणि होळकर, शिंदे, मेहेंदळे यांच्यासारखे मातब्बर सरदार त्यांच्या बरोबर होते. पराक्रमाची कमतरता नव्हती. अडचणी होत्या त्या रसद पोचत नव्हती, पैसा पोचत नव्हता, बरोबरच्या ३ लाखांच्या लोकांना पोटाला खायला घालायला धान्यही संपत आलं अशासारख्या ...त्यामुळे तळ सोडून दिल्लीकडे सरकणं भागच होते. सर्वांशी सल्लामसलत करून दुसरे दिवशी भाऊंनी तळ सोडायचा निर्णय घेतला.

बुधवार पौष शु. ८, १४ जानेवारी १७६१ ची सकाळची १० वाजताची वेळ. ३ लाख लोकांचा भरणा असलेलं, मध्यभागी बाजारबुणगे, कुटुंबीय आणि त्यांच्या रक्षणासाठी गोलाकार सैन्याची रचना करून भाऊंनी तळ सोडला. अब्दालीच्या हेरांनी ही बातमी आणल्याबरोबर ह्या संधीची वाट पाहात बसलेल्या अब्दालीने फौजेला हुकूम दिला आणि रणशिंग फुंकून त्याचं सैन्य मराठ्यांवर हल्ला करायला बाहेर पडलं. मराठ्यांना याची अपेक्षा होतीच. लढाईला तोंड लागलं आणि घमासान युध्दाला सुरुवात झाली. विजयाची इच्छा मराठ्यांकडे झुकण्याची होती. पण दुपारी त्याची मर्जी फरली. नियतीचे आडाखे वेगळे होते. तोफेचा गोळा लागून अंबारीवर बसलेले विश्वासराव पडले. आणि मराठे खचले. पाठोपाठ वीरगतीला पोचले ते राऊ आणि मस्तान यांचा पुत्र समशेरबहाद्दर.

**विश्वासरावांचा मृत्यू सत्तेला वेगळं वळण लागण्याचा संकेत नियतीने रणांगणावर घोषित केला**. विश्वासराव पडल्यावर पळणाऱ्या सैन्याची बेसुमार कत्तल अब्दालीच्या सैन्याने केली. इतकी की प्रेतांच्या ३२ टेकड्या समरांगणावर रचल्या गेल्या. अंदाजे २८००० मराठे कापले गेले. पानिपतावरचे खंदकही प्रेतांनी भरले.

दुसरा करुण, हृदयद्रावक प्रसंग घडला तो सदाशिवभाऊंच्या धारातीर्थी पडलेल्या क्षणाचा. मल्हारराव होळकरांनी रणांगणावरून पलायन केलं. उरलेल्या फौजेसकट एकटे सदाशिवभाऊ आणि जनकोजी शिंदे लढत राहिले. या दोघांना जी वीरगती मिळाली त्याने त्यांचं आयुष्य कृतार्थ झालं. मृत्यूने त्यांच्यावर घातलेला घाला मात्र फार दुष्ट होता.

सदाशीवभाऊ लढत राहिले. लढता लढता खूप दूर गेले. येईल त्या गनिमाचा समाचार घेत राहिले. असं करता करता ते एकटेच आहेत, सभोवती कुणीही त्यांचा खिदमतगार नाही हे पाहून शत्रूगोटातले दोन सैनिक त्यांच्यामागे पाठलाग करत गेले आणि त्याच्या जवळ जाऊन त्यांना विचारलं, ‘‘ तुम भाऊ हो क्या ? ‘‘ भाऊंनी लगेच त्यांच्यावर आपली तलवार उपसली आणि आवेशाने ते त्यांच्याशी लढायला लागले. ते दोघे आणि भाऊ एकटे. मोठ्या वीरश्रीने भाऊ त्यांच्याशी लढा देत राहिले, पण शेवटी त्या दोघांनी भाऊंना घायाळ केलं, पण खाली पडता पडता भाऊंनीही त्या दोघांना जबर जखमी केलं आणि भाऊंचा देह समरांगणावर कोसळला. आपल्या शत्रूचं मस्तक धडावेगळं करून त्या दोघा गनिमांनी भाऊंचा देह तिथेच टाकून मस्तक मात्र तळावर नेलं. लढाई संपली. प्रेतं, घोडे-हत्ती यांचे मृत देह, आणि रक्तामासांचा चिखल, एवढंच राहिलं.

दुसरे दिवशी अयोध्येचे काशीराज रणभूमीवर पाहणी करायला भिस्ती आणि पखाली घेऊन आले. कोणी जिवंत आहे का, कोण आपलं आहे का याची पाहणी सुरू झाली. पखाल्यांनी धडावर पाणी ओतावं, चेहरा धुवावा आणि मग बरोबरचे शिपाई धड पारखत होते. देह आपल्याकडचा की शत्रूकडचा, हे पाहणं सुरू झालं. होता होता एका नुसत्या धडावर पाणी ओतलं आणि देह वळवला तेव्हा अंगावरचं किनखापी कापड देहाची सरदारी ओळख पटवून गेलं. देह कुशीवर वळवल्यावर त्याखाली दडलेले दोन पाणीदार मोतीही बरीच माहिती सांगून गेले म्हणून देह मराठ्यांच्या तळावर आणला गेला.

भाऊंच्या खिदमतगारांनी आपला धनी ओळखला आणि तो देह भाऊंचा आहे ह्याची साक्ष पटली. काशीराजांनी मग अब्दालीच्या छावणीत निरोप पाठवून भाऊंचं मस्तक आणवलं. मग त्यावर अग्नीसंस्कार झाले. आत्मा कधीच अनंतात विलीन झाला होता.

**पानिपताच्या लढाईने सत्ताग्रहणाचा अग्रक्रमच बदलून टाकला. मोठीच कलाटणी मिळाली.** नानासाहेब पेशव्यांच्यानंतर त्यांचा थोरला मुलगा विश्वासराव पेशवेपदाचा अधिकारी होता. पण तो गोळी लागून ठार झाला. त्यामुळे २३ जून १७६१ ला नानासाहेब पेशव्यांचा मृत्यू झाल्यावर माधवराव पेशवे झाले. त्याचवेळी राघोबादादा हे अनुभवी आणि बाजीरावांचेच पुत्र असल्यामुळे त्यांना या पदाची आशा होती. पण ती असफल झाल्यामुळे पेशवे दरबारात पुढील काळात कलहाचं बीज पेरलं गेलं.

पानिपतावरुन परतत असतांना नियतीचे काही आडाखे होते. एवढा मोठा नरसंहार झाला पण नाना फडणीस आणि महादजी शिंदे हे दोघे भविष्यातले स्वराज्याचे दोन भक्कम खांब मात्र आश्चर्यकारकरीत्या वाचले होते. ' ईश्वरे तृणे करून रक्षिले ' असं नाना फडणीसांनी आपल्या आत्मचरित्रात लिहून ठेवलंय. म्हणजे ते उंच गवतात लपले आणि मारेकऱ्यांपासून वाचले. दुसरे महादजी शिंदे.. ज्यांनी इतिहास गाजवला. ते रणांगणावरून परत जातांना एक अफगाण घोडेस्वार त्यांच्यामागे लागला. पळत असतांना महादजींचा घोडा खड्ड्यात अडखळला आणि पडला. तेव्हा महादजीही खाली पडले. अफगाणाने आपला घोडा आवरला खाली उतरून त्याने महादजींच्या पायावर प्रहार केला. आणि त्यांच्या अंगावरचे दागिने घेऊन तो निघून गेला. त्याचवेळी राणेखान नावाचा एक मुसलमान बैलाच्या पाठीवर पाण्याची पखाल टाकून निघाला होता. त्याने महादजींना उचलून त्यांना सुखरूप स्थळी पोचवलं. महादजींनी त्याचे उपकार स्मरून त्याला पुढे सरसेनापतीपद दिलं. महादजी कायमचे लंगडे झाले. पण मन सशक्त होतं. त्यामुळेच त्यांच्या हातून भरीव कामगिरी झाली.

विश्वासराव पानिपतात धारातीर्थी पडल्यामुळे, नानासाहेबांच्या मृत्यूनंतर पुण्याच्या दरबारात पुढचा पेशवा कोण असा तिढा निर्माण झाला कारण त्या पदाला दावेदार पेशवे घराण्यातले दोन पुरुष होते. एक परंपरेने हकदार असलेले नानासाहेब पेशव्यांचे द्वितीयपुत्र माधवराव आणि दुसरे हक्काने नाही पण अनुभवाने आणि पराक्रमाने मोठे असलेले माधवरावांचे चुलते म्हणजे नानासाहेबांचे बंधू रघुनाथराव म्हणजेच राघोबा जे इतिहासात त्यांच्या नाना उचापतींनी प्रसिध्द झाले.

माधवराव वयाच्या १६व्या वर्षी पेशवे झाले. पण पुढची दहा वर्षे म्हणजे त्यांच्या मृत्यूपर्यंत त्याचं रक्त आटवण्याचं काम राघोबांनी केलं. दरबारात सरळ सरळ दोन तट पडले. ती फूट घराघरातल्या भावांपर्यंत पोचली. इंग्रजांना मदतीला आणण्यापर्यंत उतावीळ, थिल्लर, रंगेल स्वभावाच्या राघोबांची मजल गेली. माधवरांनी कणखरपणे घरातले आणि बाहेरचे निजाम-हैदरसारखे शत्रू मोडून काढले. पण वयाच्या २८व्या वर्षी अंगात १० वर्ष घर करून बसलेल्या क्षयाने अखेर आपला दावा साधला आणि थेऊरच्या गणेशमंदिरात माधवरावांनी अखेरचा श्वास घेतला. जातांना राघोबांकडून आपल्या धाकट्या भावाच्या, नारायणरावाच्या संरक्षणाचं वचन घेऊन आणि राज्यरक्षणासाठी राघोबादादांच्या हाती जबाबदारी सोपवूनच डोळे

मिटले. माधवरावांची फ्रेंचाना बोलावून इंग्रजांचा पाडाव करण्याची मसलत गुप्तपणे चालू होती. माधवराव वासुदेव नावाचे गुहस्थ हे काम करत होते. ती मसलत मात्र प्रत्यक्षात आली नाही. पुढे टिपूनेही तो मार्ग हाताळला. पण तोही अपयशी ठरला.

माधवरावांनंतर त्यांचे धाकटे बंधू नारायणराव पेशवेपदी आले आणि त्यातून निर्माण झाला तो इतिहासप्रसिध्द '' काका मला वाचवा '' हा मनावर जखम करून जाणारा प्रसंग, जो अजूनही लोक विसरलेले नाहीत.

माधवरावांचा थेऊरला १८ नोव्हेंबर १७७२ ला स्वर्गवास झाल्यावर नारायणराव आणि राघोबा पेशवाईची वस्त्रे आणायला सातारला गेले...कारभार सुरू झाला. पण सगळं वातावरण अस्थिरतेचं झालं. राघोबांची महत्वाकांक्षा, नारायणरावांचा उथळपणा, या दोन पक्षांमधे वाटला गेलेला दरबार, यामुळे दरबारचं वातावरण गढुळलं. मतलबी राजकारण्यांचा आपापल्या नायकाला वैचारिक गोंधळ माजवणारा सल्ला देण्याचा उद्योग, यामुळे राजकारण बिघडलं.

नारायणराव पेशवेपदी आले खरेपण. पण त्यांचा स्वभाव उतावीळ, तापट, आणि अस्थिर. त्यामुळे पदोपदी दरबारशी मतभेद व्हायला लागले. राघोबाही जवळजवळ त्याच स्वभावाचे. त्यामुळे तेही कारभार करायला उतावीळ. राघोबादादांना त्यांच्या फितुरीच्या कारणावरून कैदेत ठेवलं होतं. त्यांच्या देखरेखीवर सुमेरसिंग या गारद्याची नेमणूक नारायणरावांनी केली होती. राघोबादादांचा हुजऱ्या तुळाजी पवाराने सुमेरसिंगला कटात सामील करून घ्यायचा घाट घातला. नारायणरावांना कैद करायची आणि राघोबांना मोकळं करायचं असा बेत ठरला. मग सखारामबापू आणि मोरोबा फडणीस यांच्याही मनाचा अंदाज तुळाजीने घेतला. अटक करण्यासाठी ३ लाख रुपये देण्याचा करार कारभाऱ्यांनी केला. ती चिठ्ठी घेऊन सुमेरसिंग, बहादूरखान, महंमद इसफ, खरकसिंग असे चार गारदी दादांकडे आले. राघोबादादांनी त्यावर सही केली. आणखी १७ लोक त्यात सामील झाले. पण आनंदीबाई, राघोबांची पत्नी यात सामील नव्हती.

नेहमीप्रमाणे शनीवार २१ ऑगस्ट १७७३ रोजी गणेश उत्सव आला. शनिवारवाड्यात गणपतीचा पूजन आणि कीर्तन, पुराणं, नाचगाणी असा समारंभ सुरू झाला. दरबारातल्या धुरीणांना मात्र काहीतरी कट शिजतोय अशी कुणकुण ऐकू यायला लागली होती. रघुजी आंग्रे पर्वतीजवळ आपल्या फौजेसह उतरले होते. ३१ तारखेला अनंतचतुर्दशी होती. नारायणराव पेशवा ३० तारखेला सकाळी रघुजी आंग्रेंना भेटायला गेले. तिथून पर्वतीवर गेले. गणपती उत्सवाच्या निमित्ताने तिथे इतरही लोक आले होते. प्रसादाचं साखरभाताचं जेवण झालं आणि पेशवे वाड्यावर आले. हरिपंत फडके बरोबर होते. वाड्यावर गारद्यांची गर्दी जमली होती. म्हणून वाड्यावर न जावे अशी विनंती पेशव्यांना केली पण तरीसुध्दा, गारद्यांच्या गडबडीचा बंदोबस्त हरिपंतांना करायला सांगून पेशवे वामकुक्षीसाठी शनीवारवाड्यातच गेले. हरिपंतांनी जेवण झाल्यावर गारद्यांच्या बंदोबस्तास यायचं ठरवून तेही जेवायला निघून गेले. कटाची कुणकुण हरिपंतांनाही होती पण ती आत्ताच वाड्यावरच अंमलात येईल, आणि खुनापर्यंत मजल जाईल याचा अंदाज कुणालाच नव्हता. तुळ्या पवार मात्र पेशव्यांच्या हालचालींवर लक्ष ठेवून होता. हरिपंत आले तर कट सिध्दीस जाणार नाही, रघुजींना कटाची कुणकुण लागलेली आहे हे कळल्याबरोबर तुळ्याने घाई केली.

नाारायणराव निजायला गेल्यावर थोड्याच वेळात सुमेरसिंग आणि महंमद इसफ ७-८ शे गारदी घेऊन शनिवारवाड्याच्या बाहेर जमले. दंगा सुरू झाला. बुधासिंग जमादारास ठार करून जमाव आत शिरला. आत आल्यावर चौकात त्यांनी पगारासाठी गलका चालू केला. पेशव्यांचे खासगीकडचे इच्छापंत ढेरे त्यांना दम भरून सांगू लागले की पेशवे आता झोपले आहेत, तेव्हा कचेरीच्या वेळेत येऊन पगार मागा. तेव्हा चिथावल्या गेलेल्या जमावाने इच्छापंतांवर वार केला. ते तिथल्या गायीच्या आड लपले होते, तिलाही ठार केलं. मग बहकलेला तो जमाव वाड्याच्या आत शिरला. खोल्या खोल्यांमधे शिरून त्यांनी लूट सुरू केली. आणि लोंढा नारायणरावांच्या महालाकडे जायला लागला. महालाच्या दारातल्या शागिर्दांनी ,

नारायणराव पेशव्यांना, काय चाललंय त्याची कल्पना दिली तेव्हा ते पार्वतीबाईंकडे आले. पार्वतीबाईंनी प्रसंग ओळखला आणि पेशव्यांना सल्ला दिला की हे कृत्य तुमच्या काकांचंच आहे, म्हणून तुम्ही त्यांच्याकडे जा. तेच तुम्हाला वाचवतील. नाारायणराव पेशवे धावत दिवाणखान्यात पोचले. पाठोपाठ मारेकरीही पोचले. तोवर गारद्यांनी कैदेतून सोडवलेले राघोबादादा दिवाणखान्यात पोचलेले होते.नारायणराव पेशव्यांनी दादांच्या पायाला मिठी घालत मदतीची याचना केली. ‘ काका, मला वाचवा..‘ अशी आर्त साद घातली. पण पेशव्यांना शोधत आलेल्या सुमेरसिंगाने ‘ रावांना सोडा. नाहीतर दोघांचे जीव जातील ‘  अशी  धमकावणी केली. नाारायणराव पेशव्यांनी काकांना विनवणी केली की ‘ हवंतर मला कैदेत ठेवा..सगळं राज्य तुम्हीच करा..पण मला वाचवा..“हा सगळा गोंधळ पाहून सुमेरसिंगाने दादांना जरबेने सांगितलं की की ह्या सापाला सोडलं तर हा आमचा जीव घेतल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा त्याला दूर करा. दादांनी घाबरून पेशव्यांना दूर लोटलं. दादांनी दूर लोटल्याबरोबर तुळ्या पवाराने नारायणराव पेशव्यांचे पाय ओढले..दादांच्या पायाची मिठी सुटली आणि पेशवे दूर झाल्याबरोबर सुमेरसिंगाने वार टाकला. नारायणराव पेशवे जागीच ठार झाले. हुजऱ्या चापाजी टिळेकर आणि वाड्याचे गवई नारोबा फाटक पेशव्यांना वाचवायला धावले तेव्हा त्यांनाही तलवारीच्या घावांनी जागच्या जागी तोडून टाकलं. जासूदांचा जमादार नारोजी नाईक दादांनाच बोल लावू लागल्यावर त्याचाही प्राण घेतला. वाटेतल्या दोन कुणबिणींनांही ठार मारण्यात आलं.

शनिवारवाड्यात न भूतो, न भविष्यती असा लाजिरवाणा प्रसंग घडला. सत्तेसाठी भावांचे बळी घेण्याची परंपरा मोंगलांमधे होती. मराठ्यांमधे नाही. पण शनिवारवाड्याने ऐकलेली ‘ काका मला वाचवा ‘ ही दीन आर्त साद अजूनही लोकांच्या ह्रदयात कळ उमटवून जाते.

नारायणरावांच्या मृत्यूने गादीचा पुढचा वारस कोण, सत्ताधिकारी कोण हेही नियतीने आधीच ठरवून ठेवलं होतं. ते ठरलंही मोठ्या नाट्यमय रीतीने. वाड्यात काहीतरी प्रचंड प्रलय उसळला आहे हे बाहेर सर्वांच्याच लक्षात आलं. पण शनिवारवाड्याचे दरवाजे गारद्यांनी बंद करून घेतले होते. आत राघोबादादा, त्यांचा पुत्र अमृतराव, शिवाय आनंदीबाई, गंगाबाई, पार्वतीबाईसारखी खासी माणसं असल्यामुळे तोफा चालू करता येईनात. बाहेर बापूंसारखी दरबारातली मातब्बर माणसं जमली. आत कोण जिवंत कोण मृत, काय झालं याचा पत्ता लागत नव्हता.

इतक्यात दादांचा जासूद चिठ्ठी घेऊन बाहेर आला. ‘ गुंता उरकला, बाहेर खटपट का करता असा सवाल विचारत त्याने आत जायला सांगितलं. तेव्हा भवानराव प्रतिनिधी, सखारामबापू बोकील, बजाबा पुरंदरे, मालोजी घोरपडे आत गेले. नाना फडणीस त्यादिवशी गावात नव्हते. संध्याकाळ झाली. मशालीच्या उजेडात शरीरांचे तुकडे एकत्र करण्यास सुरुवात झाली. ज्या देहाच्या पोटातून साखरभात बाहेर पडलेला दिसला तो देह पेशव्यांचा अशी ओळख पटली. चौकात देह आणून ठेवला. पेशव्यांची पत्नी गंगाबाई सती जाण्याचा हट्ट धरून बसली. सज्जातून आनंदीबाई सर्व प्रकार पहात होत्या. दरबारातले सगळे प्रतिष्ठीत पार्थिवाभोवती गोळा झाले होते. आनंदीबाईंनी गंगाबाईंना कपाळ फोडून घेतांना पाहिलं.

आणि त्यांनी हुकूम सोडला, ‘ गंगाबाईंना अस्पर्श होऊन महिना झाला आहे. त्यांना खोलीत कोंडून ठेवा. सती जाऊ शकत नाहीत त्या..‘ सर्व राजकारण्यांच्या कानात ते शब्द देववाणीसारखे घुमले. गंगाबाई गर्भवती होत्या !

तिथेच भविष्यातला राजकारणाचा प्रवाह कोणत्या दिशेने सरकणार हे निश्चित झालं . गंगाबाईंना ३ महिने झाल्यावर सारे मुत्सद्दी गुप्तपणे एकमेकांना भेटू लागले आणि चार महिन्यांनंतर बारभाई मंडळाचा जन्म झाला. यामधे पुढाकार घेतला तो सखारामबापू बोकीलांनी. त्यांना नाना फडणीस, पटवर्धन, असे मातब्बर सरदार येऊन मिळाले. पेशवाईची वस्त्रं राघोबादादांनी

आपल्या नावांनी आणली, पण लगेच ते मोहिमेवर बाहेर पडले. ते स्वारीत असतांना त्यांच्याबरोबर असलेले एकेक मुत्सद्दी काहीतरी निमित्ताने पुण्यात जमले. आणि भावी दिशा स्पष्ट झाली. नाना आणि बापूंनी सूत्र हाती घेतली.

नाना फडणीस आणि सखारामबापूंनी गंगाबाईंना गुप्तपणे पुरंदरावर हलवलं. त्यांची रात्रंदिवस डोळ्यात तेल घालून दादा आणि आनंदीबाईपासून सुरक्षा केली. इ. स. १७७४, एप्रिल १८ ला गंगाबाई पुरंदरावर प्रसूत होऊन पुत्र झाल्याची बातमी स्वराज्याला कळली. पेशवाईचे सर्व राजकारणच बदलले **. ४० दिवसांच्या सवाई माधवरावांच्या नावाने पेशवाईची वस्त्रं आणली आणि त्यांच्या नावाने कारभार सुरू झाला**. पेशवाई सवाई माधवरावांच्या नावाने असली तरी कारभार आता नाना आणि सखारामबापूंच्या हाती आला. सत्ताधारी बदलले. पेशवाई नाममात्र राहिली.

राघोबादादा इंग्रजांची मदत मागायला गेले पण त्यातच अडकले. इंग्रजही त्यांच्या थेरांना कंटाळले. दादा परत पुण्यात आले. दादांचा डिसेंबर १७८३ साली कोपरगावला आजारपणात मृत्यू झाला. सखारामबापूंच्या फितुरीचे कागद हाती पडल्यामुळे तेही अटकेत पडले. आणि कारभार पूर्णपणे नानांच्या हाती आला. उत्तरेचा कारभार महादजी शिंदे यांच्या हाती आला. दिल्लीच्या बादशहाचे दोर महादजींच्या हाती आले.

वयाच्या एकविसाव्या वर्षी, सवाई माधवराव सज्ज्यातून खालच्या चौकात पडले. आणि त्यातच त्यांचा २७-१०-९५ रोजी अंत झाला. **राजसत्तेच्या प्रवाहाला परत एकदा कलाटणी मिळाली. राघोबादांचे चिरंजीव दुसरे बाजीराव यांनी आपल्या उचापतींनी परत पेशवाईपद मिळवलं**. नानांचा प्रभाव कमी झाला. दरबारातलं राजकारण नासलं. कुणाचा पायपोस कुणाच्या पायात नाही अशी दरबारातली अवस्था झाली. बाजीरावांना गळाला लावायला इंग्रजांना फारसे श्रम पडलेच नाहीत.

नानांनी चतुराईने मराठी सत्ता सांभाळून ठेवली होती. त्यांचा १३ मार्च १७००साली कैलासवास झाला तेव्हा इंग्रजांनी गौरवोद्गार काढले. ' पुण्यातलं चातुर्य संपलं अशी नानांना श्रध्दांजली वाहिली. त्यानंतर शिंदे- होळकर यांच्यातली कटुता आणखीनच वाढली. इ.स. १८०२ मधे यशवंतराव होळकर शिंद्यावर चालून येऊ लागताच दुसरे बाजीराव पुण्यातून पळाले आणि वसईला इंग्रजांच्या आश्रयाला गेले. इंग्रजांच्या मगरमिठीचा त्यांच्याभोवती वेढा पडला तो कधी सुटलाच नाही.

**इ. स. १८०३ मधे इंग्रजांनी बाजीरांना नाममात्र पेशवेपदाचे अधिकार देऊन शनिवारवाड्यात आणलं. पण शेवटी १८१८ मधे दुसऱ्या बाजीरावांना धूळखेड इथे अटक करून इंग्रजांनी मराठी सत्ता आपल्या हातात घेतली**. आणि शनिवारवाड्यावर इंग्रजांचा युनियन जॅक फडकला. बाजीरावांना, कानपूरजवळ विठूरला तनखा निश्चित करून कायमचं ठेवण्यात आलं.

मराठी रियासतीत जे पुरुष आपल्या पराक्रमाने उदयाला आले आणि ज्यांच्यामुळे ऐतिहासिक घराणी निर्माण झाली, ते पुरुष म्हणजे शिंदे, होळकर, पवार, पटवर्धन, फडणीस, रास्ते, पुरंदरे, बर्वे, पिलाजी जाधव, अशी अनेक होते. थोरल्या शिवाजी महाराजांच्या जाण्यानंतर त्यांच्या काळातील काही घराणी मंदावत गेली. काही नव्याने उदयाला आली. काही केवळ सरदार म्हणून नावारूपाला आली तर काहींनी राजकारणात रस घेऊन आपला ठसा उमटवला.

त्यातच एक होतं राणोजी शिंदे याचं नाव.

**राणोजी शिंदे** :- मराठी रियासतीतलं, पेशव्यांच्या पाठोपाठ दुसरं मोठं मातब्बर घराणं म्हणजे राणोजी शैंदे यांचं. बाजीराऊंच्या तडफदार नेतृत्वाखाली जे जे म्हणून तरुण शौर्य गाजवायला अधीर होते, त्या सर्वांना आपला उत्कर्ष साधायची

संधी मिळत होती. साताऱ्याजवळच्या कण्हेरखेड गावाचा राणोजी शिंदे असाच घरच्या गरिबीमुळे बाजीराऊंच्या पागेकडे बारगीर म्हणून चाकरीत आला, बाजीरावांचा खेळगडी बनला आणि आणि आपल्या बहादुरीवर आणि राऊंच्या विश्वासावर माळव्याचा अधिपती बनला. चिमाजी आपांनी इ. स. १७२८ साली माळवा जिंकल्यावर शेकडा २२.५ टक्के राणोजी शिंदे, २२.५ टक्के होळकर आणि १० टक्के पवार, चौथा वाटा सरकारचा, अशी वाटणी होऊन तिघांची माळव्यात स्थापना झाली. पुढे हे प्रमाण बदलत गेलं. शिंद्याचं घराणं पुढच्या पिढ्यांमधे खूप नावारूपाला आलं. सुरुवातीला उज्जैन ही शिंद्यांची राजधानी होती. पुढे ग्वाल्हेरच्या किल्ल्यामुळे ग्वाल्हेरला राजधानी हलवून शिंद्यांची ओळख ग्वाल्हेरचं घराणं म्हणूनच राहिली.

राणोजीला मैनाबाई उर्फ निंबाबाई या पत्नीपासून जयाप्पा, ज्योतिबा, दत्ताजी, आणि तुकोजी हे चार औरस पुत्र आणि चिमाबाई या पत्नीपासून महादजी जन्मले.

त्यात जयाप्पांचा अंत खुनाने झाला. मेवाडच्या रजपूतांच्या भांडणात शिंदे-होळकर सामील झाले. राजकारण तापायला लागलं. रजपूतांकडील लोक बोलणी करायला आले. जयाप्पा स्नानासाठी निघाले होते. ते आंघोळीसाठी बसले असतांना दगा झाला आणि तिथेच त्यांच्यावर वार झाले. त्यात जयाप्पांचं निधन झालं. लगेच जयाप्पांचे ज्येष्ठ चिरंजीव जनकोजी वारस घोषित झाले. इ. स. १७४२ मधे ओर्छावर बुंदेल्यांवर झालेल्या स्वारीच्या वेळी ओर्छेकरांनी हल्ला करुन ज्योतिबा शिंदेंना ठार केलं. इ. स. १७५८ मधे नानासाहेब पेशव्याने दत्ताजी शिंदे यांना उत्तरेत स्वाऱ्या करून पैसा आणण्यासाठी पाठवलं होतं. अब्दाली पंजाबमधे आला तेव्हा दत्ताजी शिंदे शुक्रतालावर म्हणजे आताच्या हरिद्वारपासून ४० मैलावर होते. साहजिकच अब्दालीला अडवायला तेच आपली फौज घेऊन त्याच्यावर गेले. दिल्लीहून १० मैल उत्तरेला बुरारी घाटावर त्यांनी तळ ठेवला. आणि साबाजी शिंदेला नजीबखानावर पाठवलं. मराठ्यांकडे त्यावेळी फक्त भाले आणि तलवारी होत्या. आणि नजीबखानाकडे होत्या बंदुका. १० जानेवारी १७६० या दिवशी साबाजी शिंदे या आपल्या सरदारावर बंदुकीच्या गोळ्यांचा वर्षाव होतोय आणि आपली फौज पटापट मरते आहे हे ऐकून दत्ताजी शिंदे काही लोकांना घेऊन साबाजीच्या मदतीला धावले. तोफा नेण्यास मात्र अवसर मिळाला नाही. बुराडी घाटावर दत्ताजी पोचले आणि शौर्याची शर्थ झाली, तेव्हा नजिबखानाची फौज जरा मागे हटली. प्रेतांच्या राशी पडल्या. दत्ताजी आघाडीला होते. त्यांच्यादेखत त्यांचे सरदार यशवंतराव जगदाळे गोळी लागून पडले. ते पाहिल्याबरोबर त्याच आवेशात दत्ताजी त्यांचे शव काढण्यासाठी पुढे धाव घेत होते.

पण त्याच वेळी दत्ताजींच्या कुशीत बंदुकीची गोळी लागून ते जमिनीवर कोसळले. तेव्हा कुतुबशहा हा नजिबाचा सरदार जवळ आला आणि त्यांना म्हणाले, '' क्यूँ पटेल, मेरे साथ तुम और लडेंगे ? तेव्हा दत्ताजीने जबाब दिला, '' बचेंगे तो औरभी लडेंगे..'' तेव्हा कुतुबशहाने संतापून त्यांचा शिरच्छेद केला. पानिपताच्या संग्रामातला हा पहिला बळी.

दत्ताजींचं हे बाणेदार उत्तर मराठ्यांच्या इतिहासात अमर झालं.

काकांच्या मदतीला जनकोजी धावले, त्यांनाही गोळी लागली. पण मृत्यूने तेव्हा दिलेलं जीवदान नंतर वसूल केलं.

पानिपतावर भाऊंच्या हाताखाली रणधुमाळीत तुकोजी शिंदे शत्रूची गोळी लागून धारातीर्थी पडले.

आणि जयप्पांचा पुत्र जनकोजी शिंदे..? जनकोजी शिदेंचा मृत्यू तर त्यांच्याशी क्रूर लपंडावच खेळला. आधी जीवदान आणि मग अंत..जखमी जनकोजीला बरखुर्दार नावाच्या अब्दालीच्या सैनिकाने आपल्या छावणीत आणलं. जनकोजींवर उपचार चालवले. जनकोजींकडून भरपूर दंड वसूल करून त्यांना सोडायचा त्याने विचार केला होता. पण जनकोजीला आपला सरदार औषधोपचार करतोय ही बातमी अब्दालीपर्यंत पोचली आणि त्याने त्यावर विश्वास न बसून

चौकशीसाठी माणसं पाठवली. बरखुर्दारला ही बातमी लागल्याबरोबर त्याने जनकोजींना ठार मारून पुरुन टाकलं. शिंदे घराण्याचा पुढच्याही पिढीतला आणखी एक दीप धुळीत गाडला गेला.

**महादजी शिंदे.**- महादजी शिंदे हे राणोजींचे आणि चिमाबाईंचे चिरंजीव. चिमाबाईंशी तलवारीशी लग्न लावण्याच्या पध्दतीने राणोजींनी विवाह केला, त्यामुळे महादजी राणोजींचे अनौरस पुत्र होते. पानिपतावरून नियतीने वाचवून आणलेले दोन खंदे मुत्सद्दी म्हणजे नाना फडणीस आणि पानिपताच्या लढाईत पाय गमावून लंगडे झालेले महादजी शिंदे. राणोजीं शिंद्यांचे औरस वंशज संपले. पण महादजी शिंदे जिवंत होते. त्यांना सरदारी आपल्या नावे करून घ्यायला महत् प्रयास पडले पण मग महादजी शिद्यांसारखा मुरब्बी राजकारण धुरंधर मुत्सद्दी महाराष्ट्राला लाभला. त्यांनी आणि नाना फडणींसांनी मिळून खूप मोठचं राजकारण करत इंग्रजांना स्वराज्यात प्रवेश करु दिला नाही. एकेकाळी दिल्लीचे दोर आपल्या हाती असलेल्या महाराष्ट्राचे रंग बदलले आणि मराठ्यांवाचून सत्ता चालवणं अशक्य झाल्याचा प्रकार उत्तर काळात घडला. महादजी शिंद्यांनी बादशहाला गादीवर बसवून त्याची काळजी घेण्याएवढा प्रभाव मराठ्यांचा दिल्लीवर पडला. महादजींचे पराक्रम खूप मोठे होते. कवायती फौजेची शक्ती त्यांनी ओळखून डी बोयने नावाच्या फ्रेंच अधिकाऱ्याच्या हाताखाली त्यांनी इंग्रजांशी लढण्यासाठी कवायती फौज उभारली.

पण १७९४ मधे महादजीचा मृत्यू झाल्यावर त्यांचा पुतण्या दौलतराव हा ग्वाल्हेरच्या गादीवर आला. महादजी निपुत्रिक वारले. त्यामुळे वयाच्या १५ वर्षी दौलतरावांना सत्ता मिळाली. वसईच्या तहाने १८०२ साली बाजीरावांना ताब्यात घेतलेलं पाहून दौलतराव आणि नागपूरचे भोसले इंग्रजांशी लढायला एक झाले. टिपूला संपवणारा वेलस्लीच आपल्या कँपबेल आणि स्टीव्हनसन् या साथीदारांसह या दोघांसमोर इंग्रजांतर्फे लढायला फौज घेऊन आला. शिंदे- भोसल्यांच्या फौजा जेवा आणि खेळणा या दोन नद्यांच्या बेचक्यात पसरल्या होत्या. उजवी बाजू भोकरदान गावापाशी जिथे शिंद्यांचं अश्वदळ, तसंच तोफखाना आणि कवायती फौजेची डावी बाजू असई गावापाशी होती. याप्रमाणे फौजा भोकरदान - असईच्या दोन गावांमधे पसरलेल्या होत्या. सैन्य प्रचंडच होतं.

वेलस्लीने मराठ्यांच्या फौजेवर हल्ला चढवण्यासाठी जेवा-खेळणा नदीच्या संगमाजवळ पायउतार होता, तिथे आपल्या फौजा नेऊन नदी ओलांडली. या उताराकडे मराठयांनी दुर्लक्ष केलं, ही फार मोठी चूक शिंदे – भोसले यांच्याकडून झाली. कारण वेलस्लीच्या फौजा मराठ्यांच्या फौजांसमोर आल्यावर मराठ्यांना आपला व्यूहं बदलावाच लागला. आणि ही क्षुल्लक चूक शिंदे-भोसलेंच्या पराभवाला कारण ठरली. प्रचंड शौर्याने दोन्हीकडील फौजा लढल्या. पण मराठ्यांचे सेनापती योग्यवेळी अचूक निर्णय घेण्यात कमी पडले. **दुपारी ३ वाजता सुरू झालेली ही लढाई संध्याकाळी ६ वाजता संपली. निर्णय इंग्रजांच्या बाजूने लागला. आणि शिंद्यांच्या शक्तीचा अंत झाला. आणि तेही असईच्या इंग्रजांच्या बरोबर झालेल्या लढाईत हरले. त्यानंतर ग्वाल्हेर संस्थान ब्रिटीश जमा झालं. ते साल होतं २३ सप्टेंबर १८०३.**

**नागपूरकर भोसले :-**

राजाराम महाराज जिंजीला गेले तेव्हा त्यांच्याबरोबर त्यांच्या रक्षणासाठी जे लोक होते त्यात रुपाजी भोसले होते. त्यांचा पुतण्या परसोजी भोसले. शाहू स्वराज्यात येऊन राज्य करू लागल्यावर त्यांना पहिला आधार देणाऱ्यात परसोजी होते. त्यामुळे शाहूंनी त्यांची स्थापना नागपूरला केली आणि त्यानंतर भोसले घराण्याचा पराक्रम आणि राजकारण सतत वृध्दिंगतच होत गेलं. कान्होजी, साबाजी, रघूजी असे अनेक रणधुरंधर या घराण्यात झाले. पण शेवटी असईच्या लढाईत दौलतरावांबरोबर याही घराण्याचा विरोध मावळला. **शेवटी दत्तक विधान नाकारून इंग्रजांनी हेही राज्य अस्तंगताला नेलं.**

**होळकर :-**

बाजीराव पेशव्यांनी मल्हारावांची इंदूरला स्थापना केली. मल्हारराव होळकरांच्या घराण्यात त्यांचा पुत्र खंडेराव म्हणजे अहिल्याबाईंचा पती, लढाईत मारला गेला. नातू मालराव हाही मेला.  विठोजी होळकरांचा मृत्यू फक्त दुर्दैवी ठरला. दुसऱ्या बाजीरावांनी त्यांना हत्तीच्या पायाखाली देऊन ठार केलं. दुसऱ्या बाजीरावाच्या काळात पुणे दरबारात अनागोंदी माजली. राजकारण भरकटत गेलं. एकमेकांवर वर्चस्व मिळवण्यासाठी नैतिक पातळीही रसातळाला गेली. विठोजी आणि यशवंतराव होळकर हे दोघे भाऊ बंडखोरी करत घराण्याच्या हक्कांसाठी लढत असतांना बाजीरावाच्या फौजेशी त्यांचा सामना भिडला. सरदार बापू गोखल्यांनी विठोजीला पकडलं आणि पुण्यात बाजीरावाकडे पाठवलं. बाजीराव, बाळाजी कुंजर यांनी सूडबुध्दीने विठोजीला आधी बेडी तोडून खूप मारला. २०० वार कमचाचे मारून लगेच हत्तीच्या पायाला बांधून ओढत नेला. त्याचा त्यात अंत झाल्यावरही २४ तास पर्यंत त्याचं शव तसंच वाड्याच्या चौकात मध्यावर ठेऊन दिलं. हा प्रकार १८०१ सालच्या १६ एप्रिलला घडला. विठोजीच्या या निर्घृण हत्येनंतर होळकर प्रकरण आणखीनच चिघळलं. शिंदे, होळकर, पवार, दाभाडे, प्रतिनिधी, पटवर्धन, नागपूरचे भोसले, आंग्रे, गायकवाड, हे सारे स्वराज्याच्या भिंतीचे एकएक खांब कोसळायला लागले. आणि १८१८ पर्यंत पंजाबपासून दक्षिणेतील सर्व भारतातील सर्व संस्थानिक एकेक करुन इंग्रजांचे ताबेदार झाले.

## हैदराबादचा निजाम उल्-मुल्क :-

भारताच्या इतिहासात निजाम उल-मुल्क ही एक विलक्षण व्यक्तीरेखा दक्षिणेत सत्ता गाजवून गेली आणि इतिहास निर्माण करून गेली. याच्या घराण्यात आाजा, बापापासून सगळेच पराक्रमी, राजकीय चातुर्याचे, शूर, बुध्दीवान असे निपजले.

निजामाचा आजा ख्वाजा अबिद हा मक्केला जाण्यासाठी सुरतेला पोचला आणि मग इथलाच झाला. मक्केहून परत येतांना तो औरंगजेबाच्या चाकरीत राहिला. त्याची कामाची तडफ पाहून औरंगजेबाने त्याला किलीचखान हा किताब दिला. या ख्वाजाचा मुलगा गाजीउद्दीन हाही पराक्रमी, आणि मोठा राजकारणी झाला. गाजीउद्दीनचा मुलगा म्हणजे हा हैदराबाद संस्थानचा संस्थापक निजाम उल्मुल्क. याचंच दुसरं नाव चिनकुलिचख**ान.** या निजामाची आई ही शहाजहाँचा वजीर सादुल्लाखानाची मुलगी. त्यामुळे निजामाच्या रक्तात दोन्हीकडचा मुत्सद्दीपणा, कावेबाजपणा, राजकीय चातुर्य, शौर्य,  पुरेपूर उतरलं.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या राजकारणात सशक्त कणखर बादशहा निर्माण झाला नाही, जे काही बादशहा झाले ते  'गादीवर बसवले गेले नाहीतर बाहेर फेकले गेले ' याच प्रकारचे होते. शाहूराजे स्वराज्यात येऊन राज्य करायला लागल्यावर दिल्लीहून सय्यद बंधूंनी निजाम-उल-मुल्कची, आताच्या भाषेत दक्षिणेचा गव्हर्नर म्हणून पाठवणी केली. दक्षिणेच्या सहा सुभ्यांच्या सहा अधिकाऱ्यांवरचा हा अधिकारी होता. हा मुत्सद्दी माणूस खूप राजकारण खेळला. थोरल्या बाजीरावांचा आणि याचा संघर्ष सतत चालू राहिला आणि दरवेळी बाजीराऊंकडून याला पराभव पत्करावा लागला. चिखलठाण, नालछा, पालशेत, मुंगी शेगाव, भोपाळ, या सर्व ठिकाणी बाजीरावांनी त्याला कोंडलं आणि शरणागत लिहून घेतली. शाहूराजांविरुध्द त्यांचे बंधू कोल्हापूरचे संभाजीराजे, यांनाही निजामाने चिथावलं आणि दोघांच्यात कलागत लावण्याचं राजकारण केलं. दिल्ली आणि दक्षिण भारतात याचीच सत्ता चालली.

दिल्लीच्या बजबजपुरीकडे पाहून याने दक्षिणेत स्वतंत्र होण्याची स्वप्नं पाहिली आणि पूर्वीची औरंगाबादची राजधानी बदलून, हैदराबाद ही आपली राजधानी केली. हा निजाम इ. स. १७४८ मधे वारला.

त्यानंतर आलेल्या त्याच्या पुत्रांनी नासिरजंग, सलाबतजंग आणि निजामअलि खान यांनी परत थोरल्या माधवरावांच्या काळात मोठं राजकारण केलं. त्याच्यानंतर आलेले त्याचे वारसही महाराष्ट्र, कर्नाटक, मग टिपू-इंग्रज या राजकारणात उतरले. मराठे, इंग्रज, निजाम आणि टिपू यांच्यात सतत लढाया चालू राहिल्या. मरतांना निजामाने आपल्या मुलांना मराठ्यांशी चांगले संबंध ठेवा ‘ असा उपदेश केला.

इंग्रजांच्या काळापर्यंत हैदराबाद संस्थानाचा राज्यविस्तार एवढा प्रचंड होता, आणि ते राज्य इतकं धनवान होतं की इंग्रजांनी त्यांना हात तर लावला नाहीच, उलट स्वतंत्र राहण्याचा, किंवा पाकिस्तानात सामील होण्याचा पर्यायही दिला. ब्रिटीश निघून गेल्यावर सरदार पटेलांच्या मुत्सद्दीपणामुळे शेवटच्या निजामाला स्वतंत्र भारतात सामील व्हावं लागलं.

एखाद्या रोगाने हळूहळू सर्व शरीराचा ताबा घ्यावा आणि शरीर पोखरून टाकावं तसा इंग्रजांनी भारताच्या सर्व संस्कृतीचा ताबा घेऊन त्याची मोडतोड करायला सुरूवात केली. संपूर्ण भारत त्यांच्या हाताखाली एकवटला.

नवीन परकीय अंमलाला सुरुवात झाली. पण या अंमलाचा एक वेगळाच पैलू होता. पृथ्वीच्या प्रत्येक रेखांशावर इंग्रजांची सत्ता होती. जगभर इंग्रजांची सत्ता हाही नियतीचा एक वेगळाच खेळपट होता. या एकहाती अंमलामुळे युरोपात घातल्या गेलेल्या औद्योगिक क्रांतीचा प्रसार वेगाने जगभर झाला. तिथे लागलेल्या नवनवीन शोधांचाही फायदा जगाला झाला. त्यांच्या भाषेचाही जगभर प्रसार झाला. भारत एक अखंड राष्ट्र म्हणून उदयाला आलं. जागतिकीकरणाचा तो पहिला उदय होता. केवळ भारतातच नाही तर युरोपात नेपोलियनचा पराभव करुन इंग्रज तिथेही वरचढ होते. दुसरीकडे अमेरिकेतही त्यांच्या सैनिकी हालचाली सुरुच होत्या. एक जागतिक सत्ताधीश होण्याकडे त्यांची वाटचाल चालू होती. त्यांच्या या अफाट यशाला विसाव्या शतकात बहर आला होता. त्या यशाचा शेवट विसाव्या शतकाच्या पहिल्या आणि दुसऱ्या जागतिक युध्दाने झाला. तीच इंग्रजी सत्ता आता पहायची आहे.

## इंग्रजी सत्ता :-

इ. स. १६०० च्या आसपास व्यापाराच्या नावाने भरतभूमीवर पाय ठेवणाऱ्या इंग्रजांनी व्यापार कमी आणि राजकारण जास्त खेळवत हळूहळू पुढील २०० वर्षांमधे सबंध भारतावर राज्य केलं. इ. स. १८१८ नंतर इंग्रजांची एकहाती सत्ता भारतभर सुरू झाली, पण काही वर्षातच भारतीय जनता हळूहळू या जुलमी पारतंत्र्यातही घुसमटायला लागली. भाऊबंदकीचा फायदा, आणि हिंदू – मुसलमान तेढ वाढवत यांनी राजकारण खेळवलं. कवायती फौजा, आणि आधुनिक युध्दतंत्रज्ञान यांच्या जोरावर भारतीय सत्ताधीशांवर विजय मिळवला.

सर्व भारत हाताखाली आल्यावर इंग्रजी सत्तेने आपली खरी नखं दाखवायला सुरुवात केली. सारा देश त्यांना आपल्या अंमलाखाली आणून सार्वभौम व्हायचं होतं, ही महत्वाकांक्षा आता लपून राहिली नव्हती. धर्मांतर, शिक्षणाची आणि परंपरेची मोडतोड, जुलमी कायदे, वाढलेला शेतसारा या साऱ्यांमुळे इंग्रजी सत्तेचा फास भारतावर आवळायला लागला तेव्हा इथले लोकनायक या सोनेरी पिंजऱ्यात बेचैन झाले आणि या घुसमटीतून बाहेर पडायच्या धडपडीला लागले.

दुसरीकडे, श्रीमंत संस्थानिक जे एके काळी देशभरच्या रियासतीत मोठे मोठे सरदार होते, ज्यांनी पराक्रम गाजवून आपली छाप कारभारावर पाडली होती, ते वेगळ्याच संकटात अडकले. या संस्थानिकांपैकी जे निपुत्रिक होते, त्यांना आता दत्तक वारस घेतांना इंग्रज सरकारची परवानगीची सक्ती व्हायला लागली. दत्तक घेऊ न देता, त्यांची संस्थानं खालसा व्हायला लागली. त्यांच्यातही रोष वाढायला लागला. असे अनेक संस्थानिक झाले. कित्तूरची राणी चिन्नम्मा, विठूरचा नानासाहेब पेशवा, झांशीची राणी ही तीनही घराणी याचेच बळी होते.

कित्तूरची राणी चिन्नम्मानेही इंग्रजांविरुध्द संघर्ष केला. तिचा मुलगा इ. स. १८२४ मधे वारला, तेव्हा तिने शिवलिंगप्पा नावाचा मुलगा दत्तक घेतला. पण लॉर्ड डलहौसीने परवानगी दिली नाही. राणीने त्याचा हुकूम मानला नाही. तेव्हा २० हजार फौज राणीवर पाठवली. राणी इतक्या शौर्याने लढली की इंग्रजांचा चक्क पराभव झाला. पण परत इंग्रजांनी हल्ला केला तेव्हा मात्र ती पकडली गेली आणि तिला बैलहोंगलच्या तुरुंगात इंग्रजांनी ठेवलं. ५ वर्षांनी राणीचा मृत्यू तुरुंगातच फेब्रुअरी १८२९ मधे झाला. तिच्या मुलाला इंग्रजांनी मारूनच टाकलं आणि कित्तूर खालसा करुन टाकलं.

काहीतरी करून ही इंग्रजांची ब्याद आता घालवायला पाहिजे, हा विचार भारतीय संस्थानिकांमधे बळावायला लागला. गरीब आणि श्रीमंत, सगळा भारतच असंतोषाने आतल्या आत खदखदायला लागला. उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत हा वणवा पेटला. नानासाहेब पेशवा, तात्या टोपे, झांशीची राणी यांची या वणव्यात समिधेसारखी आहुती पडली.

दुसऱ्या बाजीरावांचा मृत्यू झाल्यावर इंग्रज सरकारने नानासाहेब पेशव्यांना वारस म्हणून मान्यता देण्याचं नाकारलं. तो हक्क आता बाजीरांचे चिरंजीव, नानासाहेब पेशव्यांना बळावरच्या जोरावरच मिळवायचा होता. झांशी संस्थानची कहाणीही तीच होती. झांशीचे राजे गंगाधरपंत यांनी दत्तक घेतला आणि दुसरे दिवशी त्यांचा मृत्यू झाला. ते वारल्यावर राणीला आपल्या हक्कांसाठी तलवार हाती घ्यावीच लागली.

याची लढ्याची सुरुवात खरं तर सातारच्या महाराजांच्या पदरी असलेले रंगोजीबापू गुप्ते आणि नानासाहेब पेशवा यांच्या भेटीनंतरच झाली होती. या इंग्रजी सत्तेचं उच्चाटन करायला काहीतरी करायला हवं एवढंच या दोघांना जाणवत होतं. पण काय करावं ते कळत नव्हतं. या दोघांनी गुप्तपणे सर्व संस्थानिकांना एकत्र आणणं सुरू केलं. पण त्यासाठी कारण घडलं ते मीरतच्या सैनिकीतळावर घडलेल्या एका सामान्य घटनेचं. मीरतच्या तळावर घोडदळ पायदळाच्या सैनिकांना दिलेल्या काडतुसांना गाय आणि डुकराची चरबी लावलेली असते अशी बातमी तळावर पसरली आणि सैनिकांना ती दातांनी तोडायला लागायची. म्हणून सैनिकांनी ती काडतुसं न वापरण्याचा निर्णय घेतला तेव्हा गोऱ्या अधिकाऱ्यांनी या नकार देणाऱ्यांना तुरूंगात डांबलं. **आणि यातूनच निर्माण झालं ते १८५७ चं स्वातंत्र्ययुध्द.**

**११ मे १८५७** या दिवशी इतर शिपाई जेव्हा कवायतीसाठी बाहेर पडले तेव्हा गावातल्या लोकांनी त्यांना हटकलं आणि म्हटलं की तुमच्या भाईबंदांना या गोऱ्या लोकांनी तुरूंगात डांबलंय, त्याचं तुम्हाला काहीच कसं वाटत नाही ? कुठे गेला तुमचा स्वाभिमान ? या वाक्यावर सारे सैनिक बिथरले आणि त्यांनी इंग्रजी अधिकाऱ्याकडे आपल्या भाईबंदांची सुटका करण्याची मागणी केली. तेव्हा कमांडिंग ऑफिसरने त्याला नकार दिला. एवढंच निमित्त या उठावाला कारण ठरलं. त्यांनी गोऱ्या लोकांना मारायला सुरुवात केली. हे लोण वणव्यासारखं पसरलं.

कैद्यातल्या शिपायांना घेऊन सारे दंगा करत दिल्लीला गेले. तिथे ८० वर्षाचा बहादुरशहा जफर हा मोगल सत्तेचा शेवटचा राजा नाममात्र बादशहा लाल किल्ल्यात रहात होता, त्याच्या नावाने द्वाही फिरवली, त्याला राजा केलं ' खुल्क खुदाका

मुल्क बादशहाका '. अशा घोषणा करत गावागावात फिरू लागले, गोऱ्यांना मारू लागले. मग तिथून ते निघाले आणि दक्षिणेकडे यायला लागले. तोपर्यंत दिल्लीतील इंग्रजांनी बचावासाठी अंबाल्याहून फौज मागवली. ती फौज यायला चार-पाच दिवस लागले आणि नंतर इंग्रजांनी दिल्लीतील बंड मोडून काढलं.

**झांशी :-**

१८५७ च्या स्वातंत्र्य युध्दात '' झांशीची राणी लक्ष्मीबाई '' या नावाला अनन्यसाधारण पावित्र्य आहे. या धर्मयुध्दात झांशी आपोआप ओढली गेली. महाभारतातला चेदिराज शिशुपाल याच देशाचा राजा. इ. स. १५३१ मधे रुद्रप्रताप बुंदेला नावाच्या राजाने इथे सत्ता स्थापन केली. ओर्छा ही त्यांची राजधानी. त्या घराण्यातला राजा बीरसिंग जूदेव या बुंदेला राजाने ओर्छाजवळ ६ मैलांवर बळवंतपूर या खेड्यात १६१३ साली एक महाल बांधला. त्याचं नाव मौजमहाल. तोच पुढे झांशीचा किल्ला या नावाने प्रसिध्द झाला. वेत्रावती आणि पुष्पावती या नद्यांच्या बेळक्यात या प्रांताची स्थापना झाली. इ. स. १७२८ मधे थोरल्या बाजीरावांच्या काळात बाजीराव, बुंदेला राजा छत्रसाल याच्या मदतीला गेल्यामुळे मराठ्यांचा त्या देशात प्रवेश झाला. मराठ्यांच्या ताब्यात असलेल्या या प्रदेशाच्या कारभारासाठी थोरल्या बाजीराव पेशव्यांनी आधी नारोशंकर राजेबहादुर यांची, नंतर थोरल्या माधवरावांनी इ. स. १७६९ साली रघुनाथराव नेवाळकरांची स्थापना केली होती. त्यानंतर शिवरामपंत – रामचंद्रराव – आणि इ. स. १८३५ मधे गंगाधरपंत अशी वारस परंपरा झाली.

पण झांशीत इ.स. १८५७ मधे लढाई सुरू होण्यासाठी आधीच घटनांची मालिका विठूरला सुरू झाली होती. झांशीची राणी लक्ष्मीबाई ही पारोळ्याच्या मोरोपंत तांब्यांची कन्या. पोटापाण्यासाठी मोरोपंत पुण्यात येऊन पेशव्यांच्या चाकरीत स्थिरावले. पुण्यात इंग्रजांचं निशाण लागल्यावर पेशवे बाजीराव दुसरे यांचे बंधू चिमणाजी यांच्याबरोबर मोरोपंतही काशीला गेले. तिथे चिमणाजींचा कैलासवास झाल्यावर मोरोपंत विठूरला बाजीरावांच्या आश्रयाला आले. मोरोपंत भागीरथीबाईंना एक कन्या होती. मनकर्णिका तिचं नाव. तिला मनु म्हणत. मनु अतिशय हुशार, धीट. बाजीराव तिला छबिली म्हणत. ती बाजीरावांचे पुत्र नानासाहेब आणि टोपे यांचे पुत्र तात्या यांच्याबरोबरच खेळत मोठी झाली त्यांच्यासारखीच घोडदौड आणि तलवारबाजी शिकली. दूरवर घोडदौड करण्यात तिचा आणि नानासाहेबांचा हात धरू शकणारं कुणीही नव्हतं असा त्याकाळी प्रवाद होता.

मनु १२ वर्षाची झाली तरी तिचा विवाह झाला नाही. त्यामुळे सगळे चिंतेत असतांनाच झांशीचे राजे गंगाधरपंत आपल्या दुसऱ्या लग्नासाठी वधू शोधत आहेत अशी बातमी बाजीरावांच्या कानावर आली. मनु आणि गंगाधरपंतांचा विवाह इ.स. १८४२ , चैत्र शु. ७ शके १८९९ ला झाला. गंगाधरपंत चाळिशीच्या जवळपास आणि मनु १२ वर्षाची. लग्न करून मनु झांशीला राजवाड्यात आली. तिचं नाव लक्ष्मीबाई ठेवलं. राणीने लग्न झाल्यावरही आपले व्यायाम, घोडस्वारी, तलवारबाजी चालूच ठेवले आणि गावातल्या बायकांनाही त्याचं शिक्षण दिलं.

इ. स. १८५१ मधे लक्ष्मीबाईंना एक मुलगा झाला, त्याचं नाव दामोदर ठेवलं पण चार महिन्यातच तो गेला. त्यानंतर थोड्याच दिवसांमधे गंगाधरपंत आजारी पडले. त्यामुळे वारसाची जरूर निर्माण झाली. २० नोव्हेंबरला इ.स. १८५३ मधे गंगाधरपंतांनी आपल्याच नात्यातला आनंद नावाचा मुलगा दत्तक घेतला आणि त्याचं नाव दामोदर ठेवलं. दत्तक विधानाच्या दुसरे दिवशी २१ तारखेला गंगाधरपंतांचं निधन झालं. मग ब्रिटीश गव्हर्नरकडे दत्तक वारसाची रितसर मंजूरी मागायचं काम राणीने चालू केलं. पण इंग्रज सरकारने परवानगी नाकारली. एक जाहीरनामा काढून झांशीच्या नागरिकांनी स्वतःला इंग्रजांचे नागरिक म्हणवून घ्यावं असा आदेश दिला.

तो जाहीरनामा घेऊन स्वतः एजंट एलिस राणीकडे गेला. राणी लक्ष्मीबाई चिकाच्या पडद्याआड बसल्या होत्या. एलिसने तो जाहीरनामा वाचून दाखवला. त्यावर संतापलेल्या राणीने त्वेषाने शब्द उच्चारले..' मेरी झांसी नही दूँगी ''  शिवाजी महाराजांच्या ' हे राज्य व्हावे ही तो श्रींची इच्छा ' दत्ताजी शिंदेंच्या ' बचेंगे तो औरभी लडेंगे ' या मराठ्यांच्या इतिहासातल्या अमर मंत्रांएवढंच पावित्र्य राणीच्या या शब्दांना भारताच्या इतिहासात मिळालं. ग. ज. डलहौसीने वारस नामंजूर करून राणीचं राज्य खालसा केलं. आणि राणीला किल्ला सोडायला लावला. राणी गावातल्या राजवाड्यात जाऊन राहिली. झांशी हातात घेतल्यावर इंग्रज अधिकाऱ्यांनी गोमांस विक्रीसारखे जनतेला आणि राणीला दुखावणारे खूप निर्णय घेतले. राणीची संपत्ती खालसा केली.

इकडे दिल्लीत पोचलेल्या मीरतच्या फौजा सगळीकडे पसरल्या आणि गोऱ्यांच्याविरुध्द उद्रेक करू लागल्या. तेव्हा झांशी शांतच होती. पण बंगाल रेजिमेंटकडून एकजण पत्र घेऊन आला आणि झांशीच्या लष्करातल्या देवीसिंग, जयसिंग, जयदिनसिंग यांनी उठाव करण्याचं ठरवून झांशीच्या स्टार फोर्टवर हल्ला केला. आणि स्वातंत्र्य युध्दाला झांशीत सुरुवात झाली. ती तारीख होती ५ जून १८५७. मोठीच गडबड उडाली. इंग्रजांचं अवसान गळालं. त्यांनी राणीकडे धांव घेतली आणि आपल्या बायकामुलांचं रक्षण करायची विनंती केली. तेव्हा राणीने, ' मीच तुमची कैदी आहे, ना माझ्याकडे सत्ता, ना फौज, ना पैसा , मी काय तुमचं रक्षण करणार ' असा उलटा प्रश्न विचारला. तेव्हा स्वतःच्या रक्षणासाठी नाईलाजाने इंग्रजांनी तिला परत राणीपदी बसवलं.

राणी परत किल्ल्यात वास्तव्याला आली. झांशीतले बंडखोर सैनिक राणीकडून पैसा घेऊन दिल्लीकडे निघून गेले. राणीकडून पैसा घेऊन उठाव करणारे निघून गेले. जातांना '' खुल्क खुदाका, मुल्क बादशहाका, अंमल रानी लक्ष्मीबाईका अशा घोषणा देत निघून गेले. इंग्रजांच्या गोटातही पुढे काय करायचं यावर विचार चालू होता. त्याचा परिणाम म्हणजे सर ह्यू रोज मोठी फौज घेऊन झांशीकडे चालायला लागला. आणि २१ मार्च १८५८ रोजी झांशीसमोर त्याने तळ ठोकला. राणी झांशीच्या रक्षणासाठी स्वतः पुरुषी पोशाखात सज्ज झाली. १० दिवस घनघोर युध्द झालं. पण तिचाच एक सरदार दुलाजीसिंग इंग्रजांना फितुर झाला. तोफेच्या दारूच्या पोत्यांमधे बाजरी भरलेली सापडली तेव्हा आता पराभव अटळ आहे हे साऱ्यांच्या लक्षात आलं. तात्या टोपे मदतीला आले पण त्यांचा पराभव सर रोज ह्यूने केला.

४ एप्रिलला १८५८ ला सर्वांनी किल्ला सोडायचा निर्णय झाला. राणीने त्या रात्री १२ वर्षाच्या दामोदरला आपल्या पाठीशी शेल्याने बांधलं. त्याच्यासाठी फक्त एक रुप्याचा प्याला घेऊन राणी गुप्त वाटेने बाहेर पडली. इंग्रजांचा वेढा आणि गस्त चालू असतांनाही कशी निसटली हे सर ह्यूलाही अचंबित करणारं ठरलं. १२५ मैलांचं अंतर २४ तासात पार करून, अविश्रांत घोडदौड करत राणी काल्पीला नानासाहेब पेशवा आणि तात्या टोपेकडे पोचली. तिच्याबरोबर प्रवासात होत्या तिच्या जिवाला जीव देणाऱ्या तिच्या दासी काशी, सुंदर आणि मुंदर. राणी काल्पीला पोचली तेव्हा ती आणि तिचा घोडा इतके दमले होते की घोड्याने धाडकन जमिनीवर अंग टाकलं. राणीही थकली होती. टोपेने राणीला जेवणाखाण्याचं सामान पाठवलं, पण राणीने आणखीन एक मागणी केली. तिची मासिक पाळी सुरु झाली होती आणि त्यासाठीही तिच्याकडे वस्त्र नव्हतं. तिने तीही मदत मागितली. इतकी तिची अवस्था वाईट होती.

पण इथेही तिचा पाठलाग करत ह्यू पोचला. गलावलीजवळ परत धुमश्चक्री झाली पण ३ दिवसांनंतर राणीला तळ सोडावा लागला.  मग सगळे काल्पीहून निघाले आणि ग्वाल्हेरला पोचले. १ जूनला ग्वाल्हेरचे दिवाण दिनकरराव राजवाडे आणि ग्वाल्हेरच्या फौजेशी लढून तिने किल्ल्याचा ताबा घेतला. राणी आता निवांतपणे सुरक्षित जागी पुढचा विचार करायला लागली. तिथला खजिनाही तिच्या ताब्यात आला होता. रावसाहेब पेशवा किल्ल्यात राहिले पण राणी आपल्या २५० सैनिकांबरोबर

फुलबागेत राहिली. कवायत घेत राहिली. पुढच्या चालीवर विचार करत राहिली. लढण्याच्या नेमक्या जागा हेरत राहिली. इंग्रज फौजा येणार हेही तिला माहीतच होतं. त्याप्रमाणे सर ह्यू रोज ब्रि. स्मिथ आणि कर्नल रिडलला घेऊन ग्वाल्हेरजवळ आला.

१७ जूनला ब्रि. स्मिथने ग्वाल्हेरजवळच्या ४ मैलावर कोटाकी सराईला त्याने फौजेसह तळ ठोकला. आता राणीच्या तळावर हल्ला करुन राणीचा पराभव करणंच शिल्लक राहिलं होतं. कर्नल स्मिथने तिच्यावर हल्ला करायचं ठरवून ठेवलंच होतं. स्मिथ, ह्यू, आणि रिडल सेनेसह एकत्र आले.

**१७ जून १८५८**... राणी पुरुषी लाल पोशाख घालून युध्दासाठी तयार झाली. तेवढ्यात कर्नल स्मिथ चाल करुन येत असल्याची खबर आली. दासीने आणून दिलेलं सरबत पिऊन तिने घोड्यावर आपली मांड पक्की केली. आज तिने पागेकडचा नवीन घोडा घेतला होता. कारण तिचा लाडका घोडा अविश्रांत दौडीने थकून गेला होता. तिच्याबरोबर मुंदर आणि काशी होत्या. राणी वेगाने स्मिथच्या .. शत्रूच्या सैन्यात शिरली आणि सपासप वार करुन तलवार चालवायला लागली. राणी दोन्ही हातांनी लढत होती. तिचं ते तलवारबाजीतलं तेज तो पराक्रम पाहून स्मिथ थक्क झाला. खणखणणाऱ्या तलवारी तोफांचे गोळे, जूनमधलं कडक ऊन, लोकांच्या आरोळ्या यांनी युध्दभूमी दणाणून गेली. समोरच्या शत्रूच्या रक्ताने माखलेली राणी दोन्ही हातांमधल्या तलवारींनी बेभान होऊन लढत होती, घोड्याला आपल्या मांडीच्या दाबाने इशारा देत वळवत होती, समोरच्याला खाली कोसळवत होती. आणि इतक्यात इंग्रजांची नवीन तुकडी आली. त्या लोंढ्याच्या रेट्यामुळे राणीने आपला घोडा बाहेर काढला. १०/१२ स्वारांसह राणी पुढे निघाली कारण मागे इंग्रज लागले होते. इतक्यात मुंदरला गोळी लागली आणि ती कोसळली. इंग्रज राणीचा पाठलाग करतच होते.

राणी पुढे जात होती, इतक्यात अचानक एक नाला वाटेत आला. राणीने घोड्याला टांच देऊन ओढा ओलाडायचा इशारा दिला पण घोडा नवीन होता..कचरला.. छलांग मारेना. घोल गोल घुटमळायला लागला. इतक्यात इंग्रज शिपाई जवळ आले. त्यांच्याशी ती लढायला लागली. एकाने तिच्या मस्तकावर वार केला. तेव्हा राणीचा डोळा बाहेर फुटून आला. तरी राणी लढत राहिली. तेव्हाच दुसऱ्याने तिच्या कुशीत तलवार खुपसली. राणी धरेवर कोसळली. तिच्या गळ्यातला विखरुन पडलेला मोत्याचा मौल्यवान हार घेऊन सैनिक निघून गेले. त्यांना आपण एका स्त्रीशी लढत होतो हे कळलंही नाही.

राणीबरोबर असलेल्या रामचंद्रराव देशमुखांनी तिचा देह उचलून जवळच्या झोपडीत नेला. आणि तिथे असलेल्या गवताच्या गंजीत ठेऊन त्याला अग्नी दिला. राणीला पकडून देणाऱ्याला इंग्रजांनी बक्षिस जाहीर केलं होतं. राणीच्या इच्छेप्रमाणे तिचं शवही तिच्या विश्वासू लोकांनी इंग्रजांना मिळू दिलं नाही. राणी तेव्हा फक्त २६ वर्षाची होती.

एका तेजस्वी दीपशिखेचा अंत झाला. एक वीज धरणीवर कोसळतांना परकियांना जाळत नाहीशी झाली आणि धरतीला मिळाली. झांशी पडली. पण राणीने स्वर्गात आरोहण केलं. तिचा जाज्वल्य पराक्रमाने, कधीही न विसरण्यासारखाच इतिहास रचून ती निघून गेली. आणि रावसाहेब – तात्या टोपे फाशी गेले. नानासाहेब पेशवा यांचा ठावठिकाणा गूढच राहिला.

( राणी कायम पुरुषी पोशाखात आणि राणीचे पती गंगाधरपंत कारभाराला, उत्तम प्रशासक म्हणून प्रसिध्द होते. पण संध्याकाळ झाली ते स्त्रीचा पेहराव करत असत. स्त्रियांचे दागिने, कपडे, केशभूषा करून आपल्या महालात महिलांना आणून वेळ घालवत. राणीच्या आयुष्यातला तो योग तिच्या मृत्यूनंतरही संपला नाही. पुण्यात तिचा तलवार घेतलेला, पुरुषी पोशाखातला पुतळा ज्या भागात उबारला आहे, त्यामागेच जे नाट्यमंदिर आहे, ते आयुष्यभर स्त्रियांच्या भूमिका करून गाजलेल्या एका सामर्थ्यवान नटाच्या नावाचं आहे, या योगायोगाला काय म्हणावं ? )

भारतभर पसरलेला स्वातंत्र्य लढ्याचा उद्रेक, दक्षिणेतही पसरला. नरगुंदचे भावे असोत वा लहानमोठे संस्थानिक, सर्वच या स्वातंत्र्ययुध्दात सामील झाले होते. पण भारतभर पसरलेला हा बंडावा, हळूहळू विझला. भारतात इंग्रज कायम राहिले. त्यांच्या जाण्याची अजून वेळ आली नव्हती एवढंच नियती म्हणाली. उलट, ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार संपून इंग्लंडच्या राणीच्या नावाने कारभार सुरू झाला.

**वारस नसलेली राज्यं आपल्या पंखाखाली घेण्याच्या या इंग्रजांच्या या धोरणामुळेच भविष्यातला अखंड भारत निर्माण झाला. इंग्रजांनी हे त्या काळात सत्तालालसे पोटी केलं असलं तरी ती भावी भारतासाठी मिळालेली एक मोठी कलाटणी होती.**

१८५७ – ५८ साल संपलं. तोपर्यंत एक नवीन मोठी लाट भारताच्या कालसागरात आकार घ्यायला लागली होती. तिचं नाव होतं लोकमान्य टिळक, लाला लजपतराय, बिपिनचंद्रपाल, फिरोजशहा मेहता, गोपाळ कृष्ण गोखले, .. असे अनेक. या साऱ्यांनी आपल्या तरुणपणात राजकीय सत्ता ढवळून टाकली. इंग्रजांची जगभर नाचक्की व्हावी म्हणून टिळकांनी निखाऱ्यांवरून चालण्याचा हठयोगी मार्ग स्वीकारला. प्रत्येक गोष्ट कायद्यांच्या आधारे कोर्टकचेऱ्यांमधे डावाला लावली. इंग्रज कायद्याचे प्रेमी म्हणून त्यांनी तोच मार्ग इंग्रजांविरुध्द शस्त्र म्हणून वापरला. भारतातल्या भारतात त्यांची एखादी अन्याय्य कृती दडपली गेली असती. पण जगाला कळली नसती. म्हणून न्यायालयीन सनदशीर मार्ग निवडल्यावर जगभर त्याचे पडसाद उठू लागले. त्यात दोनदा राजद्रोहाचे खटले त्यांच्यावर चालले. तुरुंगवास घडला. मंडालेची ६ वर्षांची शिक्षा झाली. पण त्या कल्लोळातूनही प्रसवलं भारताचं भूषण ‘ गीतारहस्य. ‘ दुर्धर संकटाचंही सोनं करण्याची बळकट मानसिकता हेच लोकमान्यांचं वैभव होतं. इंग्रजांच्या अत्याचाराशी यांचा उघड संघर्ष सुरू झाला. त्यातून निघाली होमरुलची चळवळ. १९२० सालापर्यंत हे सर्व स्वातंत्र्यसूर्य क्षितीजापलिकडे गेले. ‘ आकाश कोसळलं तरी मी त्याच्या छातीवर उभा राहीन ‘ म्हणणारा हा ‘असंतोषाचा जनक ‘ १ ऑगस्टला १९२० ला क्षितिजापलिकडे गेला.

विसाव्या शतकात राजकीय सत्तांतरात प्रलय काळ उद्‌भवणारी वादळी चिन्हं जागतिक राजकीय सत्ता पटलावर दिसायला लागली होती. राजेशाही कल्पनेचा लोप होऊ लागला होता. राजघराणीच मोडीत निघणार अशी चिन्हं दिसायला लागली. नवीन विचारांची क्रांती मूळ धरायला लागली होती. फ्रान्समधे लोकराज्याला सुरुवात झालेलीच होती. इंग्लंडमधेही राजसत्ता संपुष्टात येऊन लोकशाहीला प्रारंभ झाला होता. युरोपातल्या औद्योगिक क्रांतीमुळे कार्ल मार्क्समुळे भांडवलशाहीच्या जुन्या कल्पना मोडीत निघून कामगार सत्ता हा नवीनच विचार रुजायला लागला होता. कम्युनिझम्, सोशॅलिझम्, अशा नवनवीन विचारधारा लोकमानसात पसरायला लागल्या, आणि वैचारिक क्रांतीही जन्म घेऊन वाढायला लागली.

औद्योगिकतेचं बीज ब्रिटीशांमुळे भारतातही मूळ धरायला लागलं होतं. बलुतं पध्दती, मोठमोठ्या कारखान्यांमुळे मोडायला लागली. इंग्रजांनी आणलेल्या शिक्षणामुळे भारतीय शिक्षण परंपरेचा ढाचाच बदलला. अशा वेळी एकीकडे भारतीय संस्कृतीमधे ढवळाढवळ करण्याच्या इंग्रजांच्या अगोचरपणापासून आपल्या संस्कृतीचं रक्षण करणं, नवीन शिक्षण पध्दतीचा स्वीकार करणं आणि जुन्या परंपरांचं रक्षण करणं या तिहेरी बाजूंवर समाजधुरीणांची, विचारवंतांची लढाई सुरू झाली. जनता जुनं जपावं की नवीन स्वीकारावं या संभ्रमात पडली. अशा वेळी जरूर होती ती खंबीर नेतृत्वाची.

आणि उदय झाला परत एका योध्याचा. महात्मा गांधी. अहिंसा आणि सत्याग्रह या दुधारी शस्त्राने त्यांनी इंग्रजांशी लढायला सुरुवात केली. खेडेगावाकडे चला हा नवीन मंत्र त्यांनी समाजाला दिला. अस्पृश्यांना हरिजन हे नाव देऊन, स्वतः संडास धुवायचा आदर्श त्यांनी समाजापुढे ठेवला.

याच काळात अनेक स्वातंत्र्यवीरांच्या आहुती या स्वातंत्र्य युध्दात पडल्या. काळ्या पाण्याची शिक्षा भोगण्याऱ्या भारतीय तरुणांची यादी वाढायला लागली. भगतसिंग, उधमसिंग, कान्हेरे, वासुदेव बळवंत फडके, चाफेकर, कितीतरी हिरे लखलखले. सावरकर नावाचा कोहिनूर तर जगभर क्रांतीचा संदेश पसरवणारा ठरला. आणि अंदमानात कोलू फिरवत विझला. त्याने देशभक्तांच्या मनात तेजाचं स्फुल्लिंग चेतवलं होतं. गांधीजी आणि त्यांच्यामागे जाणारे भारतीय इंग्रजी सत्तेला आव्हान देत होते. इंग्रजांनी हिंदू – मुस्लिम धर्मामधे फूट पाडून भांडणं भडकवायचा प्रयत्न चालूच ठेवला होता. त्यातून बॅ. महंमद अली जिना नावाच्या तरुणात स्वतंत्र पाकिस्तानच्या निर्मितीचं बीज अंकुरत होतं. इंग्रजी सत्तेमुळे एकसंध भारताची निर्मिती झाली होती. त्यात परत फूट पडण्याची लक्षणं दिसायला लागली होती. भरतभूमीच्या दुभंगण्याच्या दुखण्याची लक्षणं वाढायला लागली. वैचारिक मतभेदांचा, मतामतांतरांचा कल्लोळ वातावरण तापावयला लागला होता. तिकडे सुभाषचंद्र बोसांनी आपला वेगळा मार्ग चोखाळला होता. बोसांनी आझाद हिंद सेनेची स्थापना करून इंग्रजांना चावे घ्यायला सुरुवात केली.

२० व्या शतकाच्या मध्यापर्यंत इंग्रजी सत्तेला आता उतरती कळा लागली. तिचा बहर ओसरायला लागला. जागतिक सत्तांतराचे वारे वाहायला लागले. युरोपात जर्मनीत जग जिंकायच्या महत्वाकांक्षेने पछाडलेला एक तरुण झपाटला गेला होता. त्याने सारा युरोप खंड वेठीला धरला होता. इंग्लंडचं लक्ष आता स्वतःचा देश सांभाळण्याकडे लागलं होतं. भारतातही स्वातंत्र्याची चळवळ त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. १९३९ पासून एकीकडे इंग्लंड युध्दाच्या खाईत अडकायला लागला आणि युध्दखर्चाने मेटाकुटीला आला. त्याला भारत सांभाळणं डोईजड व्हायला लागलं. भारतातला असंतोष पराकोटीला पोचला होता. १९४५ साली युध्द संपलं. आणि इंग्लंडमधल्या निवडणुकीत लेबर पक्ष जिंकून आला. त्या पक्षाने भारताला स्वतंत्र करायचं त्यांचं धोरण त्यांच्या जाहीरनाम्यातून मांडलंच होतं. त्यामुळे भारताला मुक्त करणं अपरिहार्य होतं.

१९२९ सालच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात ही पूर्ण स्वराज्य ही संकल्पना आणि स्वातंत्र्यदिनाची २६ जानेवारी ही तारीख घोषित झाली. आणि त्याप्रमाणे त्यापुढील वर्षापासून उत्सव, समारंभ, कार्यक्रमही साजरे होऊ लागले. पण अनेक कारणांनी स्वातंत्र्यदिन म्हणून १५ ऑगस्ट ही तारीख निश्चित करावी लागली. शेवटी भारताला स्वातंत्र्य देण्याच्या हालचालींना वेग आला. मुस्लीम लीग स्वतंत्र देशाची मागणी करू लागला. बॅ. जीनांच्या नेतेपदाखाली बोलणी सुरू झाली.

भारतमातेच्या भाग्याला कलाटणी मिळाली, तिच्या पायातल्या दहाव्या शतकापासून पडलेल्या शृंखला गळून पडल्या. अनेक शतकांनंतर भारतमाता मुक्त झाली.

**आणि भारताचं विभाजन होऊन, १५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वतंत्र भारताचा तिरंगा फडकला**. इंग्रजांचा युनियन जॅक खाली उतरला. आणि त्याच वेळी पाकिस्तान वेगळा देश म्हणून घोषित झाला. व्हाइसरॉय माऊंटबॅटन यांच्या उपस्थितीत मध्यरात्री भारताचं ध्वजारोहण झालं. भारतीयांच्या आनंदाला पारावार उरला नाही. त्यादिवशी रात्री देशभरच्या महत्वांच्या इमारती रोषणाईने नटल्या. लोकांचे तांडेच्या तांडे रस्त्यावरून रोषणाई पाहात हिंडू लागले.

दुसरे दिवशी सकाळी भारताचे पहिले पंतप्रधान म्हणून नेहरूंनी शपथग्रहण केली. सरदार वल्लभभाई पटेल पहिले गृहमंत्री आणि उपपंतप्रधान झाले. त्यांच्यानंतर त्यांच्या मंत्रीमंडळातील इतर सर्वांचा शपथविधी झाला. भारताचे मावळते व्हाईसराय लॉर्ड माऊंटबॅटन आता पहिले गव्हर्नर जनरल झाले. त्यांची मोठ्या थाटामाटात मिरवणूक निघाली. ज्या बग्गीतून ते निघाले ती राजेशाही सोनेरी बग्गी राजे पंचम जॉर्ज भारतभेटीसाठी आलेले असतांना त्यांच्यासाठी मुद्दाम इंग्लंडमधे बनवून आणली होती. मेसर्स पार्कर आणि कंपनीने ती इंग्लंडमधे बनवली होती.

भारतावर कितीतरी शतकांनंतर स्वातंत्र्यसूर्याचा उदय झाला होता. बंगाल, पंजाब, महाराष्ट्र कर्नाटकसर्व भारतातील अनेकानेक तरुणांनी बलिदान केलं होतं. अनेक फासावर चढले होते. अनेक अंदमानाच्या अंधारकोठडीत पिचत पडले होते. त्या सर्व परलोकातील आत्म्यांनी मोकळा श्वास घेतला.

**१५ तारीखच का ? १९४७ सालच का ? मध्यरात्रीचाच मुहूर्त का ?**

भारतीय जनतेला हे तीन प्रश्न पडले होते. त्याची उत्तरं होती.. १५ ऑगस्ट ही तारीख लॉर्ड माऊंटबॅटन यांनी ठरवली होती. कारण या भारताच्या ऐतिहासिक सुवर्णदिनाला माऊंटबॅटन यांच्या आयुष्यात महत्वाचं कारण होतं. दुसऱ्या महायुध्दात जपानने त्यांच्यासमोर शरणागती पत्करली होती ती १५ ऑगस्ट १९४५ या दिवशी. म्हणून त्यांचा आग्रह होता की या दिवशी स्वातंत्र्य दिलं जावं. त्या तारखेला संमती मिळाली पण.. ..

मध्यरात्रीची वेळ निवडली गेली कारण ज्योतिषांच्या मते १५ तारीख अशुभ होती. भारताला लाभत नव्हती म्हणून इंग्रजी कॅलेंडरप्रमाणे १४ तारखेच्या मध्यरात्री मुहूर्त ठरवल्याने लॉर्ड माऊंटबॅटन यांची इच्छा पूर्ण होणार होती. आणि हिंदू पंचांगाप्रमाणे दिवस सूर्योदयाने सुरु होतो, म्हणून मध्यरात्र भारताला लाभत होती. १५ तारीख टळत होती. शिवाय भारतीय ज्योतिषांनी आणखी एक बंधन घातलं होतं. ते म्हणजे सत्ता हस्तांतराची प्रक्रिया ११ वाजून ५९ मिनिटांपासून १२ वाजून ३९ मिनिटे या ४० मिनिटांमधेच आटोपली पाहिजे. ठीक १२ वाजता शंखनाद व्हायला पाहिजे. त्यामधल्या वेळात नेहरुंनी आपलं भाषण करायचं. त्याप्रमाणेच घडलं. १२ वाजेपर्यंत नेहरूंनी आपलं भाषण संपवलं. **ठीक १२ वाजता मध्यरात्री शंखनाद घुमला आणि भारतीय इतिहासाचं नवीन पान उलटलं. भारतात लोकशाही नावाची राज्यव्यवस्था सुरु झाली.**

खरं तर लॉर्ड वॅव्हल यांनी भारताला स्वतंत्र करण्याची बोलणी भारतीय नेत्यांबरोबर सुरू केली. जून ४८ सालापर्यंत भारताला स्वातंत्र्य द्यायचं निश्चित झालं होतं. पण माऊंटबॅटन व्हाइसरॉय म्हणून रुजू झाल्यावर मात्र बोलणी सुरू ठेवण्याला खरा वेग आला. वरचेवर भेटी होऊ लागल्या आणि त्यात नेहरु - जीना यांच्यातल्या मतभेदांमुळे बोलणी लांबू लागली. पण जीनांच्या स्वतंत्र देशाच्या मागणीमुळे भारतात दंगे वाढायला लागले, वातावरण क्षुब्ध व्हायला लागलं होतं. आता फार वेळ थांबण्यात अर्थ नाही हे भारताच्या नेतृत्वाला आणि व्हाईसरॉय यांना कळून चुकलं होतं**.** त्यामुळे १९४७ साल ठरवलं गेलं.

अशा रीतीने १४ ऑगस्ट १९४७ ला पाकिस्तान निर्माण झाला आणि १५ ऑगस्ट ला भारत स्वतंत्र झाला. **नवीन अखंड भारताचा उदय झाला.**

पण या स्वातंत्र्याची जबरदस्त किंमत दोन्ही देशांना द्यावी लागली. भारतातून मुसलमानांनी स्थलांतर केलं आणि आपल्या देशात जाणं पसंत केलं तर पाकिस्तानातले भारतीय, पिढ्यान् पिढ्या त्या देशातली आपली रुजलेली मूळं उचकटून, आपलं घरदार, व्यवसाय, धनदौलत, स्नेही, शेजारी, सगळं टाकून देऊन, सोडून, भारतात यायला निघाले. या काळात प्रचंड हिंसाचार, लुटालूट नरसंहार, स्त्रियांवर अत्याचार-बलात्कार-बाटवाबाटवी असे अनेक अनाचार घडले. निर्वासितांची मनं प्रक्षुब्ध झाली. प्रकरण चिरडीला गेलं. देश मनस्वी आंदोलनातून जात होता. बलात्कार, अपहरण, लूटमार,जाळपोळ, हत्या, नरसंहार, ह्या साऱ्या हृदय पिळवटून टाकणाऱ्या आणि मनःस्ताप देणाऱ्या घटना लोक उघड्या डोळ्यांनी पहात होते, संतापाने बेभान होत होते, पण त्यांना कुणी वाली नव्हता. हैद्राबादच्या निजामाने भारतात विलीन होण्याला नकार दिला होता, आणि काश्मीरवर स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर पाकिस्तानने चढाई सुरू केली होती.

अशातच पाकिस्तानला ५५ कोटी रुपये नगद देण्याचा करार झाला होता. तो देण्याआधीच स्वतंत्र झालेल्या पाकिस्तानने काश्मीरवर हल्ले करायला सुरुवात केली. म्हणून १२ जानेवारी १९४८ ला देशाचे पहिले उपपंतप्रधान आणि गृहमंत्री असलेल्या सरदार पटेलांनी, काश्मीरप्रश्नाचा गुंता सुटेपर्यंत आणि हल्ले थांबवल्याशिवाय पैसे मिळणार नाहीत, कारण कोणत्याही प्रकारच्या मुदतीचं आमच्यावर बंधन नाही. म्हणून पाकिस्तानच्या हल्ल्यांमुळे आम्ही पैसे देणं लांबणीवर टाकत आहोत, अशी निःसंदिग्ध घोषणा केली.

त्याबरोबर पटेलांच्या या निर्णयाविरोधात गांधीजींनी दुसरेच दिवशी १३ जानेवारीपासून आमरण उपोषणाला सुरूवात केली. त्यातून राजकीय प्रवाहात अचानक एक प्रचंड भोवरा निर्माण झाला. १४ जानेवारीला, गांधीजींच्या या धमकीने भरलेल्या या निर्णयामुळे तत्कालिन सरकारने आपला निर्णय तात्काळ बदलला. आणि ५५ कोटी रुपये पाकिस्तानला ताबडतोब देण्याचा निर्णय गांधीजींच्या दबावामुळे घेतला गेला.

या निर्णयामुळे भारताच्या इतिहासातली एक अभूतपूर्व घटनेची बीजं मातीत रुजू लागली. त्यातून घडला आयुष्यभर अहिंसेची कास धरणाऱ्या महात्मा गांधी यांचा मृत्यू.

**३० जानेवारी, १९४८.** संध्याकाळची ५ वाजण्याची वेळ..महात्मा गांधीजी नेहमीप्रमाणे आपल्या प्रार्थना सभेसाठी बिर्ला हाऊस मधून बाहेरच्या हिरवळीकडे निघाले. मनु आणि आभाही नेहमीप्रमाणे त्यांच्याबरोबर होत्या. आधीच रोजच्या वेळेपेक्षा गांधीजींना १० मिनिटे उशीर झाला होता. त्यामुळे गांधीजी आपल्या या मुलींवर नाराज झाले होते आणि त्यांना रागवत होते. . प्रार्थना स्थळाच्या चार पायऱ्या चढणं बाकी होतं. बापू शेवटच्या पायरीवर असतांनाच बापूजी..बापूजी अशी हाक मनुने ऐकली.

मनुने एक खाकी पोशाखातला खिशात हात घातलेला तरुण पाहिला. तो तरुण पुढे झाला आणि नमस्ते बापूजी असं म्हणत त्याने दोन्ही हात जोडले. मनुने त्याला बाजूला करत समजावत सांगितलं की आधीच बापूंना दहा मिनिटं उशीर झाला आहे..त्याक्षणी नथुरामने तिला बाजुला सारलं.. दोन्ही पंजात लपवलेलं पिस्तुल पुढे केलं..नमस्ते बापूजी म्हणत गांधाजींवर पिस्तुलाच्या तीन फैरी झाडल्या.. महात्मा गांधी कोसळले. '' **हे राम ' त्यांच्या तोंडून शेवटचे शब्द निघाले. तेव्हा संध्याकाळचे ५ वाजून ७ मिनिटं झाली होती. एक महात्मा परलोक प्रवासाला गेला. अचानक, आयुष्यभर लढणारा हा अहिंसावादी कणखर नेता क्षणार्धात मृत्यूच्या विळख्यात अडकला. जानेवारीच्या थंडीत सायंकाळी सूर्य अस्ताचलास जात असतांना भारताचा मोहनचंद्र अस्ताला गेला.**

नथुराम गोडसेला अटक झाली. त्यांच्यावर खटला चालला आणि नंतर फाशीची शिक्षा झाली. महात्मा गांधींचा वध हा निश्चितपणे निषेधार्ह कृत्य होतं. सरकार असतांना त्यांनी हातात कायदा घेतला. या सर्व घटनांचं न्यायालयात केलेलं नथुराम यांचं निवेदन गोपाळ गोडसे यांनी १९६५ मधे स्वतःची शिक्षा भोगून सुटून आल्यावर छापलं. १९७१ साली ' पंचावन्न कोटींचे बळी ' या पुस्तकातून गोपाळारावांनी नथुराम गोडसे यांचं निवेदन प्रसिध्द केलं.

नथुरामवर खटला सुरु झाला. खटला ऐकायला फाळणीचं दुःख भोगलेले, आपली माणसं गमावलेले, पैसा घालवलेले, अनेक पिडीत असत. न्यायाधीश खोसला यांनी सेवानिवृत्तीनंतर त्या कालातल्या न्यायालयाचं शब्दचित्र रेखाटलं होतं. त्यात त्यांनी लिहिलं होतं :- ' नथुरामने आपल्या बचावासाठी आमच्यासमोर केलेलं ओघवतं वक्तव्य ते सर्वश्रेष्ठ आकर्षण होतं. पूर्ण भरलेलं न्यायालय इतकं भावनाविवश झालं होतं की, त्यांचे उसासे आणि हुंदके ऐकू येत होते. त्यांचे

डबडबलेले डोळे आणि ओघळणारे अश्रू दिसत होते. सर्व न्यायालयातील प्रेक्षकांना न्यायदानाचं काम सांगितलं असतं तर नथुराम निर्दोष आहे असाच निर्णय त्यांनी प्रचंड बहुमताने दिला असता यात मला तिळमात्र शंका नाही. '

पृथ्विराज चौहानच्या पराभवापासून  कायम मुसलमान, इंग्रज यांच्या परकीय अंमलात राहिलेला भारत खरोखर मुक्त झाला. लोकशाही राजवट नावाचा राजप्रवाह स्थिरावून वहायला लागला आहे. नवीन प्रवाह, नवीन पिढी, नवी विटी-नवं राज्य..आता परत सोन्याच्या धूराची वलयं या स्वतंत्र भारतात उमटू लागतील. हिंदूंची ही भूमी सुजलाम सुफलाम् होईल. आता इंग्लंडचंही तेज मावळलं आहे आणि महासत्तेचा बिंदु अमेरिकेकडे सरकला आहे. दुसऱ्या महायुध्दापासून राजकारण आता जागतिक पटलावर आलं आहे. कित्येक देशांचे नकाशेही बदलले आहेत. विज्ञानक्रांतीमुळे आता दूर १० हजार मैलांवर असलेल्या देशातल्या सत्तेत काही बदल झाले तरी त्याचे पडसाद लगेच एका क्षणात जगभर उमटतात. १९ व्या शतकातील राजकारणाच्या प्रवाहानेही राजे-रजवाडे-बादशहा-सुलतान सम्राट ही जुनी कात टाकून साम्यवाद, समाजवाद, लोकशाही, हुकुमशाही, असा नवीन अवतार धारण केला आहे.

हा आहे भारतातल्या अतिप्राचीन ते अर्वाचीन अशा अनेकानेक राजसत्तांच्या उगम, विलास आणि विलय, यांचा इतिहास आणि सत्ताकेंद्रांच्या बदलांचा आलेख. हा राजकीय प्रवाह भविष्यात कुठे जाईल?...माहीत नाही..कुठलं वळण घेईल ..माहीत नाही..देश कोण चालवेल?.. माहीत नाही.

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान हा अनेक कवी व लेखकांनी सुरू केलेला एक नवीन प्रयोग. मराठी मध्ये वाचक आणि साहित्यिक अधिक जवळ यावेत आणि एक मोठी चळवळ इंटरनेटच्या माध्यमातून सुरू व्हावी अशी इच्छा होती. हिंमते मर्दा. मददे खुदा. किंवा हल्लीच्या भाषेत सांगायचं तर सच्ची लगन हो तो अपने सपने हासिल करनेके लिये सारी कायनात एक हो जाती है. मराठी भाषेत उत्तम दर्जेदार साहित्य निर्मिती व्हावी, चांगले वाचक एकत्र यावेत, त्यांना चांगल्या दर्जाचे साहित्य मिळावे आणि दर्जेदार लिहू इच्छिणाऱ्या लेखकांना असे वाचक मिळावेत. एवढेच काय ते आमचे छोटेसे स्वप्न. या आमच्या छोट्याशा स्वप्नाला लाखो वाचकांची साथ मिळत गेली आणि कारवां बनता गया. त्याचबरोबर दर्जेदार लिखाण करणारे लेखकही या चळवळीत जोडले जात आहेत. डॉ. स्मिता दामले या त्यातीलच एक. लोकमान्य टिळकांचे एक वेगळया अंगाचे, त्यांच्या मानवी कंगोऱ्यांचे दर्शन घडवणारे चरित्र, व रक्षा हा रक्षा या शब्दाच्या विविध अर्थांतून निर्माण होणाऱ्या कथांच्या संग्रहानंतर आज त्यांनी कलाटणी हे भारताच्या भव्य इतिहासाचे मिनिएचर दर्शन घडवणारे पुस्तक आणले आहे. अशा पुस्तकांनी ई साहित्य चे पुस्तक संग्रहालय समृद्ध होत आहे.

पण आम्ही समाधानी नाही. बारा कोटींच्या या मराठी समाजात किमान एक दोन कोटी तरी समंजस, चोखंदळ वाचक असायला हवेत. ज्ञानोबा तुकोबांच्या संस्कारांत वाढलेल्या या समाजाकडून एवढी अपेक्षा ठेवायला काय हरकत आहे? मित्रहो. ज्योतीने ज्योत तेवत जावी. तसे वाचकांनीच वाचक जोडायला हवेत. तुम्हाला जर हे स्वप्न पूर्ण होण्यात हातभार लावावासा वाटत असेल तर फ़क्त एवढेच करा. आपल्या ओळखीपाळखीतल्या किमान दहावीस लोकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवा.

असे ई मेल आय डी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही VIP वाचक दर्जा देतो.

आमचा पत्ता : esahity@gmail.com

अधिक माहितीसाठी भेट द्या : www.esahity.com

आपले नम्र
टीम ई साहित्य


SOGDIANA
Turfan
FERGHANA
Kucha
CHINA
Kashgar
PAMIR
BACTRIA
Bactra
Surkh Kotal
Begram
HINDU-KUSH
GANDHARA
Taxila
HIMALAYAS
(Imaus)
ARACHOSIA
KUSHAN
EMPIRE
Mathura
Indus
GEDROSIA
Saketa
Pataliputra
Ujjain
Barbaricum
WESTERN
SATRAPS
Vidisa
Champa
Kundina
Barygaza
Pratishthana
Pune
SATAVAHANA
EMPIRE
Amaravati
PANDYAN
KINGDOM
CHOLAS
TAMRAPARNI
KINGDOM